नाट्यरूप

# शा कुं त ल

कविकुलगुरु कालिदास यांच्या " अभिज्ञान शाकुंतलम् "
या संस्कृत नाटकाची त्रुटित मराठी रंगावृत्ति.


रचनाकार

द. स. अबपकर

गीतें

कै. गु. आण्णासाहेब किर्लोस्कर

कै. गु. देवल

श्री. माधव पातकर





स्कूल ॲण्ड कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर

---

मूल्य २ रुपये

# पुरस्कार

कुलगुरु कालिदासाच्या संस्कृत "अभिज्ञान-शाकुन्तलम्" वरून श्री. द. स. अंबपकर यांनी तयार केलेली मराठी रंगावृत्ति मीं वाचून पाहिली. या रंगावृत्तीचे दोन विशेष एकदम डोळ्यांत भरण्यासारखे आहेत. मूळ संस्कृत नाटकें फार मोठी म्हणून किंवा तीं तीन-साडेतीन तासांच्या प्रयोगांत बसविण्यासारखीं करायला हवींत म्हणून, अनधिकृत संकोच-विस्तार केलेला बरेच वेळां दिसून येतो. यामुळें मूळ नाट्यकृतीचा डौल आणि प्रमाणबद्धता बिघडून जाण्याचा संभव फार असतो. कांहीं वेळेस, महत्त्वाचा भागच गाळला जातो; यामुळें नाट्यवस्तु संपूर्ण स्वरूपांत डोळ्यांसमोर उभी रहात नाहीं. श्री. अंबपकरांच्या रंगावृत्तींत शांकुतलाची समग्र नाट्यवस्तु साकार झाली आहे. त्यांत दुष्यन्त-शकुंतलेचा प्रणय, शकुंतलेची पाठवणी, दुष्यन्ताने तिचा केलेला अव्हेर, पुढें अंगठी सांपडल्यानंतर दुष्यन्ताच्या पोळलेल्या मनाचा विलाप आणि शेवटीं मारीच आश्रमांतील पुनर्मिलन या सर्व घटना समतोलपणें प्रकटल्या आहेत, हा या रचनेचा विशेष आहे. दुसरी गोष्ट अशी कीं, उगीच काव्यमय भाषा वापरण्याचा मोह टाळून येथील संवाद जे साधे, सुटसुटीत झाले आहेत तेहि नाट्यदृष्ट्या परिणामकारक म्हणायला हरकत नाहीं. मधून येणाऱ्या श्लोकांच्या तर्जुम्यांत किंवा पदांत हवें तें काव्य येऊन जातें आहेच.

रंगावृत्तीसाठीं श्री. अंबपकरांना अनेक दृष्यें जोडून घ्यावीं लागलीं आहेत, किंवा वेगळीं पाडावीं लागलीं आहेत. मूळ संस्कृत नाटकांची अंका-अंकांची सलग रचना आणि सात अंकांची मांडणी लक्षांत घेतां असें करणें अपरिहार्य आहे. कांही ठिकाणीं हा बदल इष्ट झाला आहे. परंतु एक-दोन स्थळांबाबत मतभेद होण्याचा संभव आहे. उदाहरणार्थ, पहिल्या अंकांतील अनुसूया आणि प्रियंवदा यांचीं भाषणें, अनुसूयेचा गंभीर स्वभाव आणि प्रियंवदेचा खेळकर, खोडकर स्वभाव जमेस धरून बिभागलीं पाहिजेत. तसें येथें झालें नाहीं. तीच गोष्ट दुर्वासाची मनधरणी करायला दोघींपैकीं कोण जाते याबाबत. हा दोष मात्र मूळ संस्कृत आवृत्तीमुळें झाला

# पुरस्कार

कुलगुरु कालिदासाच्या संस्कृत "अभिज्ञान-शाकुन्तलम् " वरून श्री. द. स. अंबपकर यांनी तयार केलेली मराठी रंगावृत्ति मीं वाचून पाहिली. या रंगावृत्तीचे दोन विशेष एकदम डोळयांत भरण्यासारखे आहेत. मूळ संस्कृत नाटकें फार मोठी म्हणून किंवा तीं तीन-साडेतीन तासांच्या प्रयोगांत बसविण्यासारखीं करायला हवींत म्हणून, अनधिकृत संकोच-विस्तार केलेला बरेच वेळां दिसून येतो. यामुळें मूळ नाट्यकृतीचा डौल आणि प्रमाणबद्धता बिघडून जाण्याचा संभव फार असतो. कांहीं वेळेस, महत्त्वाचा भागच गाळला जातो; यामुळें नाट्यवस्तु संपूर्ण स्वरूपांत डोळयांसमोर उभी रहात नाहीं. श्री. अंबपकरांच्या रंगावृत्तींत शाकुंतलाची समग्र नाट्यवस्तु साकार झाली आहे. त्यांत दुष्यन्त-शकुंतलेचा प्रणय, शकुंतलेची पाठवणी, दुष्यन्ताने तिचा केलेला अव्हेर, पुढें अंगठी सांपडल्यानंतर दुष्यन्ताच्या पोळलेल्या मनाचा विलाप आणि शेवटीं मारीच आश्रमातील पुनर्मिलन या सर्व घटना समतोल-पणें प्रकटल्या आहेत, हा या रचनेचा विशेष आहे. दुसरी गोष्ट अशी कीं, उगीच काव्यमय भाषा वापरण्याचा मोह टाळून येथील संवाद जे साधे, सुटसुटीत झाले आहेत तेहि नाट्यदृष्टया परिणामकारक म्हणायला हरकत नाहीं. मधून येणाऱ्या श्लोकांच्या तर्जुम्यांत किंवा पद्यांत हवे तें काव्य येऊन जातें आहेच.

रंगावृत्तीसाठीं श्री. अंबपकरांना अनेक दृश्यें जोडून घ्यावीं लागलीं आहेत, किंवा वेगळीं पाडावीं लागलीं आहेत. मूळ संस्कृत नाटकांची अंका-अंकांची सलग रचना आणि सात अंकांची मांडणी लक्षांत घेतां असें करणें अपरिहार्य आहे. कांही ठिकाणीं हा बदल इष्ट झाला आहे. परंतु एक-दोन स्थळांबाबत मतभेद होण्याचा संभव आहे. उदाहरणार्थ, पहिल्या अंकांतील अनुसूया आणि प्रियंवदा यांचीं भाषणें, अनुसूयेचा गंभीर स्वभाव आणि प्रियंवदेचा खेळकर, खोडकर स्वभाव जमेस धरून विभागलीं पाहिजेत. तसें येथें झालें नाहीं. तीच गोष्ट दुर्वासाची मनधरणी करायला दोघींपैकीं कोण जाते याबाबत. हा दोष मात्र मूळ संस्कृत आवृत्तीमुळें झाला

असण्याचा संभव आहे; कारण सर्वच आवृत्तींत या दोघींचीं भाषणें त्यांचीं स्वभाववैशिष्टें लक्षांत घेऊन विभागलेलीं दिसत नाहींत.

पांचव्या अंकांतील दुष्यन्ताचें अंतर्द्वन्द्व मुळाप्रमाणें अधिक परिणामकारक होणें जरूर आहे असें मला वाटतें. येथें पुरोहिताचीं वाक्यें जीं दमनक नांवाच्या नवीन निर्माण केलेल्या अंगरक्षकाला दिलीं आहेत तीं तशीं देण्याची कांही जरूरी नाटचदृष्टचा वाटत नाहीं.

अधिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे सातव्या अंकांत स्वर्गारोहणाच्या प्रसंगीं दुष्यन्तानें विदुषकालाहि बरोबर नेल्याचें जें दाखविलें आहे तें नुसतें अनाठायींच नाहीं तर प्रेक्षकांना पटण्यासारखेंहि नाहीं. दुष्यन्त आपल्या अलौकिक सामर्थ्यानें इंद्राचा मित्र म्हणून स्वर्गाची यात्रा करूं शकत होता; पण हे सामर्थ्य राहोच, अशी संधिदेखील एका मूर्ख ब्राह्मणाला मिळेल हें अशक्य आहे. सातव्या अंकांतील घटना एकसंध करण्यासाठीं श्री. अंबपकरांनी मातलीचाच उपयोग केला असता तर बरें झालें असतें.

मात्र त्याचबरोबर मूळच्या सहाव्या अंकांतील दासी-कंचुकीचा प्रवेश गाळून, मोहर तोडण्याची घटना सानुमतीकडूनच साधून घेण्यांत कथावस्तूची मांडणी अधिक आटोपशीर आणि परिणामकारक झाली आहे. त्याचप्रमाणें हंसपदिकेच्या गीताने अव्हेराच्या दृश्याचा आरंभ आणि शेवट ( अंक ३, प्रवेश १ ) साधण्यांत काव्यमयता आहे. मात्र, या प्रवेशाच्या शेवटीं दुष्यन्त हंसपदिकेच्या महालात जातो असें दाखविण्यांत कालिदासाला अभिप्रेत असलेला दुष्यन्ताचा स्वभाव नीट दर्शविला जातो कीं काय याविषयीं मी साशंक आहे.

परंतु एकदरींत माझ्या अवलोकनांत आलेल्या रंगावृत्तीमध्यें प्रस्तुत रंगावृत्ति बरीच उजवी आहे. कालिदासाची समग्र नाटचवस्तु उभी करतांना, दुष्यन्ताचें स्मृति प्राप्त झाल्यानंतरचें दुःख दाखविणें, विषय आणि नाटच या दोनहि दृष्टींनीं आवश्यक आहे. लेखकाने केलेले सर्वच बदल अंकातील नसले तरी या रंगावृत्तींत समग्र शाकुंतल समतोलपणें प्रकट झालें आहे हा लाभ कमी मोलाचा नाहीं.

— गोविन्द केशव भट

## परिचय

भारताच्या भूगौलिक वैभवाची साक्ष नगाधिराज हिमालय देत असेल, त्याच्या तत्त्वज्ञानाची थोरवी भगवत्‌गीतेंत प्रतिबिंबित झाली असेल तर त्याच्या काव्यात्मतेची प्रचीति पटविण्यास महाकवि कालिदासाचें "शाकुंतल" नाटक समर्थ आहे. "काव्येषु नाटकम् रम्यं, तत्रापि च शकुंतला" हें वचन सुप्रसिद्ध आहे. सर विल्यम जोन्स यांनीं केलेलें शाकुंतलाचें इंग्रजी भाषांतर वाचून "कालिदास हा हिंदुस्थानचा शेक्सपीअर आहे" असें इंग्रज लोक म्हणूं लागले आणि जर्मन भाषेंतील भाषांतर वाचून, महाकवि गटे हा तर आनंदानें नाचूं लागला ! मग गडकऱ्यांनीं 'भगवान कालिदास' असा कालिदासाचा उल्लेख करावा यांत नवल कोणतें ?

एकोणिसाव्या शतकांत शाकुंतलाचीं कांही मराठी भाषांतरें झालीं असलीं तरी शाकुंतल म्हटलें कीं आण्णासाहेब किर्लोस्करांच्या ( मराठी ) शाकुंतल नाटकाची आठवण होते. अण्णासाहेबांच्या शाकुंतलानें "संगीत" नाटकांचा एक अजब प्रकार मराठी रंगभूमीवर निर्माण केला इतकेंच नव्हे, तर मराठी रंगभूमीचा नूरच पालटून टाकला. त्यांच्या किर्लोस्कर नाटक मंडळीनें तिच्या जीवनाच्या पहिल्या अडीच वर्षांत त्या एकाच नाटकाचे शेकडो प्रयोग केले.

त्यानंतर प्रथम "सौभद्र" आणि नंतर अनेक नवीं नाटकें रंगभूमीवर आल्यामुळें, शाकुंतलाच्या प्रयोगांची संख्या साहजिकच कमी झाली; तरी १९१५ सालपर्यंत त्याचे प्रयोग वारंवार होत असत. त्यानंतर मात्र त्यांची संख्या कमी होतां होतां वर्षांतून एखाद दुसरा प्रयोग होऊं लागला आणि गेल्या तीस पस्तीस वर्षांत तर एकंदर पांचदहा प्रयोगसुद्धां झाले नसतील !

किर्लोस्करांच्या शाकुंतलासाठीं ज्या दर्जाच्या आणि जितक्या गायक नटांची गरज असते तितके आतां एकाच संस्थेत उपलब्ध नाहींत म्हणून त्याचे प्रयोग बंद झाले असें म्हणतां येईल. परंतु मराठी रंगभूमीच्या परिस्थितींत आणि मराठी प्रेक्षकांच्या अभिरुचींत जो बदल झाला आहे

त्यामुळेंच किर्लोस्करांच्या शाकुंतल नाटकाचे प्रयोग बंद झाले असें म्हटलें पाहिजे. किर्लोस्करांचें शाकुंतल हें कालिदासाच्या शाकुंतलाचें, फारसा फरक न केलेलें रूपांतर होतें. गतिमान् कथानकांचीं नाटकें पहावयाची संवय लागलेल्या प्रेक्षकांना शाकुंतल नाटकाची संथ गति आतां कंटाळवाणी आणि नाट्य-विघातक वाटते. पात्रांनीं वाक्यागणिक पदें म्हणावीं हा प्रकार संगीत नाटकांच्या षोकीनांनासुद्धां आतां पटेनासा झाला आहे. " नाटकांत नाटक शाकुंतल, त्यांतहि चौथा अंक आणि त्या अंकांतसुद्धां कण्वाचे चार श्लोक " असा रसिकांचा अभिप्राय होता. काव्यदृष्टचा हा अभिप्राय अजूनहि निरपवाद असला तरी नाटयदृष्टचा शाकुंतलाच्या चवथ्या अंकाला किंवा त्यांतील " श्लोकचतुष्ठयाला " आतां पूर्वीसारखें महत्त्व राहिलेलें नाही. ज्या समाजाला अनेक वाढलेल्या मुलींची काळजी वाहावी लागत आहे, कन्येबरोबर ( हुंडयासाठीं ) धनाचेंहि दान करावें लागत आहे, किंवा ज्या समाजात मातापितरांच्या नकळतसुद्धां प्रीतिविवाह होत आहेत, तो समाज " जाते की मम शकुंतला " या कण्वाच्या दुःखाशीं, " परक्याचे धन कन्या " या वर्णाशी, किंवा " वाडवडिलां सेवित जावें। " आणि-( बहुभार्याबंदीचा कायदा अंमलांत आल्यावर ) " सवतीशीं प्रेम करावें " या उपदेशाशीं समरस कसा व्हावा ?--हा दोष कालिदासाचा नसून, तो बदललेल्या अभिरुचीचा आणि परिस्थितीचा प्रभाव आहे.

परंतु कालिदासाच्या शाकुंतलांत इतर अनेक असे असामान्य गुण आहेत कीं ते बदललेल्या परिस्थितीवर आणि अभिरुचीवरसुद्धां मात करूं शकतील. त्या गुणांनी युक्त असलेलें नाटक मराठी रंगभूमीवर होत रहावें आणि सामान्य प्रेक्षकालासुद्धां कविकुलगुरूच्या काव्य आणि नाटयचातुरीचा आस्वाद घेतां यावा, यासाठीं आधुनिक अभिरुचीला रुचेल अशी शाकुंतलाची रंगावृत्ति तयार करणें म्हणूनच अवश्य ठरतें. या दृष्टीनें ' लोकसत्ता 'कार श्री. ह. रा. महाजनी यांनी गेल्या वर्षी एक प्रयत्न केला असून, श्री. अंबपकर यांचा हा दुसरा प्रयत्न आहे.

श्री. अंबपकर हे मराठी चित्रपट व्यवसायांतील एक सुप्रसिद्ध लेखक आणि दिग्दर्शक असून, कांही नाटकाचें सुद्धां त्यांनीं दिग्दर्शन केलें आहे. या रंगावृत्तींत कालिदासाच्या शाकुंतलाचा विस्तार त्यांनी कमी केला

असला, अनावश्यक किरकोळ पात्रें कमी करून कांही किरकोळ प्रसंगांचा नाट्यपरिपोषासाठीं अनुक्रम बदलला असला आणि नाटकाचे अंक कमी करून त्यांची विभागणी निराळ्या पद्धतीनें केली असली तरी स्वतःच्या पदरचें असें अंबपकरांनीं कांहींहि घातलें नाही. या रंगावृत्तींत जें आहे तें कालिदासाचें असून, त्याचे शक्य तितक्या प्रामाणिकपणाने, सहजतेनें आणि सुरसतेनें मराठी रूपांतर करण्याचा अंबपकरांनी प्रयत्न केला आहे.

परंतु या 'रंगावृत्ती'ची खरी यशस्विता अंबपकरांच्या किंवा कोणाहि दिग्दर्शकाच्या दिग्दर्शन-चातुर्यावरच अवलंबून राहील. प्रत्यक्ष दिग्दर्शन करतांना अजूनहि एखादा शब्द किंवा एखाद्या वाक्याची घडण बदलावीशी वाटली किंवा काही वाक्यांच्या जागीं पदांची योजना करावीशी वाटली तर तें क्रमप्राप्तच समजलें पाहिजे. परंतु काव्यात्मता आणि निसर्गरम्यता ही शाकुंतलाची एक असामान्य शक्ति आहे हें विसरता कामा नये. एखाद्या बोलपटाप्रमाणें शाकुंतलाची नायिका संकटांत सांपडते आणि त्यापासून नायक तिची मुक्तता करतो हें खरें, पण तिला संकटांत टाकणारा कोणी खलपुरुष नसून तिच्या मुखकमलाभोंवती गुंजारव करणारा भ्रमर आहे ! शाकुंतलेला नटविण्याकरिता कालिदासानें कुबेराची मदत घेतली नसून "क्षीर तरूनें शालु दिला हा, लाक्षारस दुसऱ्याने" असा प्रकार आहे आणि म्हणूनच प्रत्यक्ष प्रयोगातील पात्रयोजनेंत, अभिनयात, प्रकाशयोजनेंत, नेपथ्यांत आणि संगीतांत शाकुंतलाची काव्यात्मता आणि निसर्गरम्यता प्रकट झाली पाहिजे. शाकुंतलाची रम्यता कायम राखण्याकरितां किर्लो-स्करांनीं सबंध नाटकांत संगीताचा स्वर पद्यद्वारां खेळता ठेविला होता. पदांची संख्या अत्यंत कमी केल्यावर, रसपरिपोषक अशा पार्श्वसंगीताचा स्वर सबंध नाटकात खेळता राहिला पाहिजे असें मला वाटतें.

श्री. अंबपकरांनीं अत्यंत उत्साहानें केलेला हा प्रयत्न यशस्वी होवो असें मी इच्छितों.

— वसन्त शान्ताराम देसाई

या रंगावृत्तींत एकूण बावीस भूमिका आहेत. इतकीं पात्रें जमवून प्रयोग करणें आजकालच्या स्थितीला शक्य नसल्याने या बावीस भूमिका केवळ तेरा पात्रांनी कराव्यात अशी योजना सुचवीत आहे.

ती सूचना करतांना शक्याशक्यतेचा पूर्ण विचार केला आहे.

| | |
|---|---|
| १ दुष्यंत | — |
| २ दमनक | — |
| ३ माधव्य | — |
| ४ भरत | — |
| ५ शकुंतला | — |
| ६ अनसूया | — |
| ७ सूत्रधार | कण्व व कोळी |
| ८ नटी | गौतमी व भानुमती |
| ९ प्रियंवदा | तापसी ( वृद्ध ) |
| १० १ ला ऋषि | पुरोहीत |
| ११ २ रा ऋषि | शिपाई |
| १२ शारंगरव | मातली |
| १३ शारद्वत | शिपाई |

वरीलप्रमाणे क्रमांक ७ ते १३ या भूमिका करणाऱ्या पात्रांनी आणखी कोणकोणत्या भूमिका कराव्यात हें त्यांच्यापुढे दर्शविलें आहे.

एकूण आठ पुरुष-पात्रें, एक लहान सात वर्षांचा मुलगा व चार स्त्री-पात्रे अशा तेरा पात्रांत कार्यभाग उरकतां येईल. वरील पात्रांत तीन स्त्री पात्रें व तीन पुरुष-पात्रें गाणारीं असावी.

दुसरी भूमिका करतांना वेशभूषा व रंगभूषा यांच्याकडे लक्ष द्यावें.

—द. स. अंबपकर

# मनोगत

कालिदासगिरां सारं कालिदाससरस्वति ।
चतुर्मुखोऽथवा साक्षाद्विदुर्नो तु मादृशाः ।।

कालिदासाच्या वाणीचें आकलन एक स्वतः कालिदास, दुसरी सरस्वति आणि तिसरा साक्षात् ब्रह्मदेव एवढ्यांनाच काय तें होणारें. माझ्यासारख्या इतराना खरोखरच त्यांत कांही कळत नाही; हें समजतें पण-आणि मनाचे कांही छंद असे असतात कीं ते मनुष्याला आपल्या शक्तीच्या, बुद्धीच्या व आवाक्याबाहेरच्या गोष्टीशी खेळण्यांचे अव्यापारेषु-व्यापार करायला लावतात. तसाच हा एक मनाचा व्यापार !

सन १९४३ मध्ये कोल्हापूर येथील मराठी नाट्यशतसांवत्सरी-उत्सवांत गुरुवर्य आण्णासाहेब किर्लोस्कर यांच्या शाकुंतल नाटकांतील चौथ्या अंकाचा मी प्रयोगनिष्ठ अनुवाद करून रंगभूमीवर प्रदर्शित केला. महोत्सवाचे अध्यक्षानाहि तो प्रवेश फार आवडला. सौ. विमल कर्नाटकी, मास्टर दुर्गाराम खेडेकर व माझे बंधु श्री. कृष्णराव अंबपकर यांनी आपल्या संगीत कलेंतील नैपुण्याने व अभिनय गुणानी तो प्रयोग चांगलाच रंगविला. प्रयोगाचा मार्गदर्शक म्हणून माझे सर्वांनी अभिनंदन केलें. त्यामुळेच सर्वनिष्ठ शाकुंतल नाटकाचा प्रयोगनिष्ठ अनुवाद करावा असें मनानें घेतलें. पण चित्रपट सृष्टीतील त्यावेळच्या कामामुळें मला ती गोष्ट चटकन् हातावेगळी करता आली नाहीं.

सन १९५५ मध्यें कोल्हापूरच्या विद्यापीठ हायस्कूलचा मोठा समारंभ आजचे भारताचे राष्ट्रपति माननीय श्री. राधाकृष्णन् यांच्या अध्यक्षतेखालीं होणार होता. त्या वेळीं विद्यापीठाच्या आजी व माजी विद्यार्थ्यांचा एक नाट्यप्रयोग करावयाचा असें संस्थेने ठरविलें व माजी विद्यार्थी म्हणून तें काम माझ्यावर सोपविलें गेलें. तेव्हां इतर कामांतून सवड काढून मी शाकुंतलची रंगावृत्ति तयार केली व रंगभूमीवर तिचा प्रयोग करून तिच्या प्रयोग निष्ठतेचें मूल्यमापनहि केलें. त्या प्रयोगात कु. कान्होपात्रा, मास्टर दुर्गाराम, अरुण सरनाईक व स्वतः मी, अनुक्रमें-शकुंतला, कण्व, दुष्यंत, शारंगरव,

अशा भूमिका केल्या. त्या प्रयोगानें या रंगावृत्तीचें प्रायोगिक—मूल्य व गुणदोष याचें मला सम्यक् दर्शनहि झालें.

नंतर सन १९५७ साली या अनुवादाचें वाचन डॉ. वाळिंबे यांच्याकडे पुण्यास झालें. त्यांच्या ज्ञानाचा व मार्गदर्शनाचा लाभ मला जो झाला, त्यामुळें ही रंगावृत्ति बरीच सुधारली व अशी ती नीटस् रंगावृत्ति पुस्तक-रूपानें प्रसिद्ध करण्याचे १९५८ च्या अखेरीस मी ठरविलें.

त्याच वेळी माझ्या या रंगावृत्तींत शकुंतलेची भूमिका करणाऱ्या कु. कान्होपात्रा या नटीनें, " तुमच्याप्रमाणेंच नव्या स्वरूपांत श्री. ह. रा. महाजनी यांनीं संगीत शाकुंतल लिहिलें असून त्यांत मीच शकुंतलेची भूमिका करणार आहे. " असे नवलवृत्त मला सांगितलें. श्रीयुत ह. रा. महाजनी यांच्यासारख्या सुविद्य, संस्कृत वाङमयाशीं परिचित असणाऱ्या विद्वानानें व सिद्धहस्त संपादकानें शाकुंतलचें रूपांतर तयार करून मुंबईच्या कला-मंदिर या संस्थेचे श्री. गोपीनाथ सावकार ते रंगभूमीवर आणीत आहेत हें ऐकून मला खरोखरीच आनंद झाला. कारण ज्या मनीषेनें मीं ही रंगावृत्ति करण्याचे योजिलें होतें त्याची सफलता, एक ख्यातनाम संपादक व एक मराठी रंगभूमीचे सेवक अशा मोठ्या दोघांनी महत्त्वाकांक्षेनें रंगभूमी-वर आणण्याचें ठरविले यात झाली असें मला मनोमन वाटलें व मी माझ्या रंगावृत्तीचें मुद्रण स्थगित केले. कारण त्याचें वय्यर्थ कांही आहे असें वाटेना. मूळ गु. अण्णासाहेबांचें शाकुंतल सुविख्यात असूनहि रंगभूमीवर त्याचे प्रयोग न होणें याचें कारण या नाटकाची प्रदीर्घता, गीतप्राधानता व अलिकडच्या चार साडेचार तासांच्या कालावधीत न आवरणारी प्रयोगशीलता हे आहे असें मानून मी रंगावृत्तीच्या रचनेला उद्युक्त झालों होतों. तेंच कार्य श्री. महाजनींच्या व श्री. गोपीनाथ सावकारांच्या हस्तें होत आहे, आणि दोघांशी माझा स्नेह असल्यामुळें जणुं आपलाच हेतु सफल झाला असें मला तेव्हां वाटलें.

नंतर मुंबईस त्या रूपांतराचा प्रयोगहि पाहिला. श्री. सावकारांनीं खूप पैसे खर्च करून, नेपथ्यरचना व प्रयोग फारच चांगल्या प्रकारें प्रदर्शित केला. पुस्तकहि प्रसिद्ध झालें, त्यातील गुणदोषांची चर्चा मी करीत नाही. कारण नाट्यलेखन हा माझा मूळ व्यवसाय नव्हेच ! तसा माझा अभि-

काराहि नाही. मी कोणी टीकाकारहि नाही. पण एक गोष्ट खरी कीं श्री. महाजनींच्या रूपांतरासारखी माझी रंगावृत्ति नाही, अशी माझी खात्री झाली. एक स्वैररूपांतर तर दुसरा केवळ प्रयोगनिष्ठ अनुवाद !

सन १९५९ च्या मध्यास मी पुन्हां डॉ. वाळिंबे यांना भेटलों व चर्चा केली. त्यांनी प्रोत्साहन दिले म्हणून या रंगावृत्तीचें मुद्रण केलें. नाटकाची छापील प्रत प्रा. डॉ. गो. के. भट व श्रीयुत वसंत शां. देसाई यांना दाखवून त्या उभयतांचा पुरस्कार व परिचय यासह हें नाटक–रंगावृत्ति प्रकाशित होत आहे. अर्थात याचे प्रायोगिक मूल्य व यश ही गोष्ट रंगभूमीवरील प्रयोगानें सिद्ध होणारी आहे, यांत तिळमात्र शंका नाही.

या रंगावृत्तींतील कांही पदें मूळचीं गु. देवलांची आहेत. त्या पदांचा अंतर्भाव या माझ्या रंगावृत्तींत करण्यास व प्रयोगसमयीं त्याचा वापर करण्यास गु. देवलांचे नातु श्री. गो. रा. देवल यांनी मला परवानगी दिली याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. गुरुवर्य देवलांची पदें हें एक या रंगावृत्तीचें लेणें आहे. गुरुवर्य देवलांचें ऋण सदैव माझ्यावर राहील.

कविकुलगुरु कालिदासांच्या कृतीचा मी केवळ अनुवादक. तेव्हां यांतील जें जें कांही चांगलें तें तें सर्व गुरुवर्यांचें, व जे कांही अप्रयोजक ते सर्व माझें. गु. अण्णासाहेब किर्लोस्कर यांनी केलेलें शाकुंतलचें मराठी समग्र भाषान्तर प्रमाण मानून मी रंगावृत्ती करण्याला प्रवृत्त झालों. तेव्हां त्यांचा मी ऋणाईत आहेच. तसेच श्री. गोडबोले, श्री. लेलेशास्त्री, डॉ. वाळिंबे यांनी केलेली शाकुंतलचीं मराठी भाषान्तरें मला साहाय्यभूत झालीं. कारण संस्कृत भाषेशीं माझा मॅट्रिकला पास होण्याइतकाच संबंध–म्हणजे यथातथाच ! तेव्हां मूळ संस्कृत नाटकापेक्षां वरील सर्वांच्या भाषान्तराचा मी पुरेपूर उपयोग करून घेतला हें नमूद करणें हे माझें कर्तव्य समजतों. या सर्वांचा मी आभारी आहे.

त्याचप्रमाणें माझी रंगावृत्ति वाचून मला योग्य त्या सूचना केल्याबद्दल डॉ. गो. के. भट आणि श्री. व. शां. देसाई यांनी केलेल्या कांही सूचना माझ्या भावी अशाच एखाद्या रंगावृत्तीच्या वेळीं उपयुक्ततेच्या आहेत त्यासाठींहि मी या सर्वांचा आभारी आहें.

माझा जो नाटय व चित्रपट धंद्याशीं संबंध आला, त्यांतील माझ्या थोडयाफार यशाचें बीजारोपण ज्यांच्यामुळें झाले त्याचें श्रेय श्री. (गु.) भालजी पेंढारकर यांनाच आहे. तेव्हां ही माझी रंगावृत्ति त्यांच्यातील गुणविशेषात्वाला त्यांनाच अर्पण करीत आहे व त्यांनी ती स्वीकारून माझ्यावर मोठा लोभ दर्शविला असेंच मी मानतों. कारण सन १९४३ पासून म्हणजे त्यांच्या "बहिर्जी नाईक" या चित्रपटाचें दिग्दर्शन केल्यापासून माझा व त्यांचा ऋणानुबंध व साहचर्य हें लौकिक-दृष्टया संपलें आहे. तरीहि त्यांचे कलात्मक उपकार मी विसरूं शकत नाही.

शेवटीं श्री. माधव पातकर व श्री. ना. गो. मुनिश्वर या माझ्या मित्रांनी मला या कामीं जे प्रोत्साहन दिलें, त्यांचें मला स्मरण राहील. तसेंच स्कूल अॅण्ड कॉलेज बुकस्टॉलचे श्री. दा. ना. मोघे यांनीं माझ्यासारख्या साहित्याशीं किंचितहि संबंध नसलेल्या माणसाचा एक छंद केवळ स्नेह-भावानें पुरविण्यासाठीं ही रंगावृत्ति प्रसिद्ध करण्याचें धाडस केलें याची मला जाणीव राहाणार नाही असें मी कसें म्हणूं ?

—इत्यलम्.

मंगळवार पेठ,
कोल्हापूर

—द. स. अंबपकर

## सूचना —

नाटक ' प्रोज ' पद्धतीनें मुद्रित केलें आहे. परिशिष्टामध्ये पदें ज्या ज्या ठिकाणीं तीं नमूद केलीं आहेत त्यांचा वापर करतांना त्या त्या ठिकाणीं असलेले पदानुषंगीक संवाद द्विरुक्ती टाळणेसाठीं म्हणणें टाळावें.

नाटयप्रयोगाचे समयी वेळेचें बंधन नसेल व संगीत पात्रांची अनकूलता असेल, तर प्रयोग-कारांनी पुढील पदें ज्या त्या ठिकाणीं म्हणावीत. अंक व पृष्ठक्रमांकावरून व पदांच्या अर्थावरून पदाची योग्य ती जागा दिग्दर्शकाच्या ध्यानीं येईलच.

( अंक १ ला : प्र. १ ला : पृ. ४ )

**सूत्रधार**— हां हां दुष्यंत भूपाला, आंवरी रे बाण आपुला।
आश्रमींच्या हरीणबाला, व्यर्थ मारूं नको रे ॥

( अंक १ ला : प्र. २ रा : पृ. ९ )

**प्रियंवदा**— उगिच कां गे दोष मला देसी।
वाढवि अवयव यौवन म्हणुनि, कंचुकी रुतली अशी ॥

( अंक २ रा : प्र. २ रा : पृ. ३० )

**दुष्यंत**— झाली सफल ही मम मनकामना ॥
स्मर तापवि बहू परी तो आतां,
मुखवित किती तरी या मना ॥ १ ॥
उष्ण दिनातीं मेघाच्छादित,
दिन करी सुखयुत तो जना ॥ २ ॥

( अंक २ रा : प्र. २ रा : पृ. ३५ )

**दुष्यंत**— काय मला भूल पडली, भान हरपले।
तें मुख वर केले परी नाही चुंबिले ॥ काय० ॥
सुंदरीने अंगुलीनीं ओंठ झांकिले।
नको नको ऐसे म्हणत तोंड फिरविले ॥ काय० ॥
प्रेमभरे तिनें अर्ध नेत्र मिटियले।
ऐशा त्या ऐन रंगी व्यंग जाहले ॥ काय० ॥

( अंक २ रा : प्र. २ रा : पृ. ३५ )

**शकुंतला**— मना तळमळसी, उगीच कां हळहळसी,
प्रथम फसलेसी ॥ मना० ॥
ऐन सुखाच्या समयीं भीती धरूनी,
कसे बसलेसी ॥ मना० ॥

( अंक ४ था : प्र. १ ला : पृ. ६५ )

**सानुमती**— आम्रमंजिरी तुला अर्पिते नमुनी मीनकेतुला।
निजधनु ओढूनी पहा कसा हा मन्मथ सरसावला ॥
पाच बाण सोडी विरहिणीवर सहाबा तू हो भला.

॥ श्रीदत्त प्रसन्न ॥

# नाट्यरूप शाकुंतल

---

## अंक पहिला



### प्रस्तावना

( ग्रंथकर्त्यांची प्रार्थना )

पंचतुंड नररुंडमालधर पार्वतीश आधी नमितों ।
विघ्नवर्गनग भग्न कराया विघ्नेश्वर गणपति मग तो ।
शाकुंतल कालिदासरचित हें नाट्यरूपी रचितों ।
जाणुनिया अवसान नसोनि महत्कृत्य शिरीं घेतों ।
ईश्वराचा लेश मिळे तरि मूढ यत्न शेवटीं जातो ।
दत्तात्रय, बलवंत कविसवें वाक्पुष्पीं रसिकार्जन करितों ॥१॥



## प्रवेश पहिला

( स्थळ:-- कण्वमुनींच्या आश्रमाचें परिसर )

(सूत्रधार आपल्या पारिपार्श्वकांसह प्रार्थना करीत आहे.)

नांदी

**राग**—तिलककामोद ताल—सवारी

**अष्टमूर्ति परमेश सदाशिव तुम्हां शिव देवो ।**
**यद्रूपाविण विश्व न हा विश्वास हृदयीं भरवो ॥ ध्रु० ॥**
**ब्रह्मोत्पत्तिपूर्वीलि जें जलरूप तोचि जाणा ।**
**विधिहुतहवि धारण करणारा तोचि अग्निराणा ।**
**हवि, होता, रवि, शशि, नभ, भूमि, वायू तोचि म्हणा ।**
**ऐशा या तनूंचा स्वामी तो दुरित सर्व पळवो ॥ १ ॥**

( विधात्याने पहिली सृष्टी म्हणून निर्माण केलेलें जल; यथाविधि आहुति स्वीकारणारा अग्नि; यज्ञांत आहुति देणारा यजमान; कालाची नियमिती करणारे चंद्र आणि सूर्य; ज्यामुळे शब्द ऐकूं येतो व जें अखिल विश्वाला व्यापून टाकतें तें आकाश; सर्व बीजांचे मूलस्थान असणारी पृथ्वी; आणि जीवमात्रांचा प्राणभूत वायु; अशा अष्ट प्रकृतींनी नटलेला भगवान् पार्वतीपति आपणा सर्वांचें रक्षण करो ! )

( नांदी संपतांच पारिपार्श्वक नमस्कार करून जातात. )

**सूत्रधार :**— ( आंत पाहून ) प्रिये, नेपथ्यरचनेची पूर्तता झाली असली, तर जरा इकडे ये पाहूं !

**नटी :**– (प्रवेशून) हं, ही पहा आलें.

**सूत्र० :**– हें बघ, या नाट्यगृहांत विद्वान आणि गुणग्राही रसिक प्रेक्षकजन उपस्थित आहेत, तेव्हा त्यांच्या मनोरंजनासाठी कविश्रेष्ठ कालिदासांच्या 'अभिज्ञान शाकुंतल' या नवीन नाटकाचा प्रयोग करून दाखवावा असं मनांत आलं म्हणून तुला बोलावलं.

**नटी :**– मग मी आपल्या वचनाबाहेर का आहे ? आपण सांगायचं, सारी कांही प्रयोगाची सिद्धता आहे.

**सूत्र० :**–ते झालं, पण मनांत असूनहि निश्चय होत नाही. कारण—

**नटी :**– पण मी म्हणतें नाट्यविषय चांगला आणि नटवर्गहि कुशल असल्यावर आपल्या मनांत अशी शंका यावीच कां मुळी ? शिवाय आपण नाट्यकलेंत किती निपुण आहांत याची या उपस्थितांना चांगली माहिती आहे. तेव्हा —

**सूत्र० :**– असंच म्हणून चालत नाही. सूज्ञ आणि रसिक प्रेक्षकांना नाट्यप्रयोग आवडला, तरच त्या कलागुणांची सफलता ! प्रज्ञावंतहि स्वतःच्या ज्ञानाबद्दल साशंक असतात.

**नटी :**– तुमचं हें नेहमीचंच आहे. उगीच शंका–कुशंका काढावयाच्या ! पण मला आधी हें सांगा, इतकं मोठं सात अंकी प्रदीर्घ नाटक —

**सूत्र० :**– त्याच गोष्टांचा विचार करून, जुन्याची पूर्णतः कल्पना यावी आणि नव्याची किंचित् भर दिसावी अशा संयोगानं

व प्रयोगाच्या दृष्टीनं सुटसुटीत अशी, कविश्रेष्ठांच्या या ज्येष्ठ नाटकाची मी रंगावृत्ति बांधली आहे.

**नटी :**– मग ठीक !

[ पडद्यांत– भरधांव येणारा रथ थांबल्यामुळे, एकाएकी रथाचा व घोड्यांच्या टापांचा आवाज बंद होतो. ]

**नटी :**– अगबाई, रथ कुणाचा येऊन थांबला ?

**सूत्र :**– तो ना ? कण्वमुनींच्या तपोभूमींत मृगयेकरिता आलेल्या राजा दुष्यन्ताचा ! तो पहा, राजा रथांतून उतरून सिद्धचाप असा पायींच धांवतो आहे. अरे, हिंस्र पशूच्या ऐवजी तो आश्रमीय काळवीट त्याच्या शरसंधानाला बळी पडणार वाटतं ? चल, प्रिये: ऋषिवरांच्या या पुण्यभूमींत ही हत्या होऊं देतां उपयोगी नाहीं. थांब, राजा, थांब ! आपला बाण आवर! आश्रमीय मृगाला मारायचं नसतं ! त्याला मारूं नको. थांब, राजा थांब !

( सूत्रधार व पाठोपाठ नटी धांवत जातात. )

**प्रस्तावना समाप्त**



## प्रवेश दुसरा

( स्थळ :–आश्रमीय परिसर– एक काळवीट पडदा उघडतांच पळत गेल्याचें दिसतें व त्याच्या मागोमाग अंगरक्षक दमनकासह राजा दुष्यन्त सिद्धचाप असा प्रवेश करतो, आणि काळविटावर नेम धरून बाण सोडणार तोंच पुढून दोन वृद्ध ऋषि आडवे येतात. त्यांच्या खांद्यांवर समिधांचे लहान भारे आहेत. )

१ ला ऋषि :–थांब, राजा, थांब! अरे, ते आश्रमीय हरिण बालक आहे. पुष्पराशीवर अग्नी टाकावा तसा त्या कोमल शरिराच्या मृग बालकावर प्रहार करूं नको ! कुठं त्या पाडसाचा नाजूक जीव आणि कुठं तीक्ष्णपणें घुसणारा तुझा हा वज्रासारखा कठोर बाण !

राजा :–तो आश्रममृग आहे म्हणतां ?

२ रा ऋषि :–हो! आणि राजा, तुझा शस्त्रसंभार दीनांच्या रक्षणासाठी आहे. निष्पाप जीवांचा प्राण घेण्यासाठी नाही.

राजा :–ही तपोभूमि आहे ! अरे, होय की ! मृगयेच्या नादांत मला अवधानच राहिलं नाही. हा पहा बाण मीं परत घेतला.
( बाण काढून भात्यांत घालतो. ऋषि त्याला आशीर्वाद देतात. )

१ ऋषि :–पुरुवंशाच्या कुलदीपकाला हें कृत्य शोभतं खरं ! राजा, तुला तुझ्यासारखाच सद्गुणी आणि चक्रवर्ति-लक्षणांनीं युक्त असा पुत्र लाभेल.

राजा :–मुनिजनांच्या आशीर्वादाचा मी आनंदानं स्वीकार करतों.

**२ रा ऋषि :**—राजा, तुझं इतर कांही महत्त्वाचं काम नसेल तर आश्रमांत येऊन अतिथि–सत्काराचा स्वीकार केल्याशिवाय तं जाऊं नको.

**१ ला ऋषि :**—तो पहा, नदीतीरीं भगवान् काश्यपांचा आश्रम दिसतो आहे.

**राजा :**—इतक्या जवळ येऊन कुलपति कण्वांचं दर्शन न घेता मी तसाच कसा जाईन ?

**१ ला ऋषि :**—कण्व महर्षि सांप्रत आश्रमांत नाहीत. पण कोणी पाहुणे आले तर त्यांचा आदर-सत्कार करण्याचं काम आपल्या कन्येला–शकुंतलेला सांगून ते गेले आहेत.

**राजा :**—ठीक ! ठीक ! येतील प्रहराभरांत–तोपर्यंत मी थांबेन.

**२ रा ऋषि :**—गुरुजी शकुंतलेच्या प्रतिकूल दैवाची शांति करण्याकरिता सोमतीर्थाला, गेले आहेत. त्यांना परत यायला निदान चार मासांचा तरी अवधि लागेल.

**राजा :**—त्यांचं दर्शन होणार नाही हें माझं दुर्दैव ! पण इतर मुनिजनांचं दर्शन कांही कमी मोलाचं नाही !

**१ ला ऋषि :**–बरं, आम्ही येतों तर ! यज्ञासाठी समिधा आणण्याकरिता आम्ही गेलों होतों, ऋत्विज वाट पहात असतील.

( राजा त्यांना वंदन करतो, ते जातात. )

**राजा** :--दमनका, मृगयेच्या नादांत खरंच मोठी चूक होत होती माझ्या हातून ! हं, घे.

[ धनुष्य व भाता देतो. ]

आणि हें पहा; मी आश्रमांत जाऊन येईपर्यंत आपला मित्र तो माधव्य भटजी, कुठं भटकतो आहे तें पहा. या अरण्यांत चुकून भलतीकडेच जायचा !

( दमनक जातो, राजा आश्रमाकडे जाण्यासाठी वळतो तोंच पडद्यांत " इकडं या सख्यांनो, इकडं या. त्या वेलींना नाही का पाणी घालायचं ! )

**राजा** :--कोण ! कोणी आश्रमकन्यका दिसताहेत ! किती सुरम्य दृश्य ! आपल्या शरीरसौष्ठवाला अनुरूप अशा कुंभांनी, वेलींना पाणी घालणाऱ्या या तापसकन्यांचं अंतःपुरांतहि दुर्लभ असं लावण्य पाहून, वनलतांनी राजोद्यानांतील वेलींना आपल्या श्रेष्ठ गुणांनी लाजविलं असंच म्हटलं पाहिजे.... कोण बरं असाव्यात या ? असेनात का कुणी ? आश्रमांतील कुमारिकांबद्दल इतकी उत्सुकता बरी नव्हे. पण त्यांच्यांत प्रामुख्यानं वावरणारी ती कोण असावी बरं ? पहावा ! ........साध्या वल्कलांत असूनहि किती रमणीय !

> शेवाळान पुरं वेढलेलं कमलपुष्प जसं सुरम्य दिसतं,
> किंवा चंद्रावरचा कलंक जसं त्याचं सौंदर्यच वाढवितो, तशी
> ही सुंदरी वल्कलामुळे अधिकच सुंदर दिसते आहे--अथवा
> जातीच्या सुंदरांना कांहीहि शोभतं हे जास्त खरं......

कोण बरं असावी ही ? कुलपति कण्वांची कन्या शकुंतला तर

नसेल ! पण कुलपति ब्रह्मचारी असा लौकिक........छे ! ही खात्रीनं क्षत्रियकन्याच असली पाहिजे. एरवी माझ्या सत्प्रवृत्त मनाला हिचा मोह पडलाच नसता.

( मुलींचा हंसण्याचा आवाज जवळ ऐकूं येऊं लागतो. )

**राजा** :—या इकडेच येताहेत वाटतं ? किती हांसत खेळत येताहेत ! माझ्यासारख्या परक्या पुरुषाला पाहून बिचकतील. त्यांच्या आनंदाचा विरस करण्यापेक्षा आपणच लपून रहावं—

( राजा झाडाआड उजव्या बाजूच्या वृक्षराजींत लपतो, शकुंतला व तिच्या मैत्रिणी कडेवर पाण्याने भरलेले कलश घेऊन डाव्या बाजूनं प्रवेश करतात. )

**अनसूया** :—अग, इकड या ! प्रियंवदे, आपण जरा बसूंया ना ग !

**प्रियंवदा** :—सखे शकुंतले, ये, अशी. थोडी विश्रांति घे. आज की नाही तूं फार श्रमलीस. तुझ्या वाटणीचं पाणी मी घालतें हवं तर.

**शकुंतला** :—नको ! इतकी कांही मी दमलेली नाहीं. खरं म्हणजे तुम्हींच केलं आहे सारं काम.

**अन०** :—प्रियंवदे, कण्वबाबांचं अपत्यप्रेम, आमच्या सखीपेक्षा या वेलींच्यावरच जास्त असावं —

**प्रियं०** :—होयच नाही तरी ! नाहीपेक्षा नवमालिकेच्या फुलाहूनहि सुकुमार अशा या आपल्या कन्येला, झाडांना पाणी घालण्याचं कष्टाचं काम त्यांनी सांगितलंच नसतं.

शकुं० :—बाबांची आज्ञा म्हणूनच मी हें काम करतें असं नाही. या वेली मला माझ्या भावंडासारख्या प्रिय आहेत बरं.

प्रियं० :—तें झालं ग. आम्हांला एक माहीत आहे म्हणून. पण एखाद्या परक्या माणसानं हें पाहिलं तर तो म्हणेल, ' या वृद्ध कण्व-मुनींना हें कसं समजत नाही की या अव्याज—मनोहर रूपाच्या आपल्या कन्येला हीं असलीं आश्रमीय कामें करायला सांगणं म्हणजे नाजूक कमलदलानं शमीवृक्षाची फांदी तोडण्याचा प्रयत्न करण्यासारखं आहे म्हणून !

शकुं० :—कोणी कांही म्हणत नाही. तुम्हीच कांहीतरी म्हणतां. अनसूये, या वेलींना चार दिवसांपूर्वीं पाणी घातलं होतं ना ग ! पहा किती तहानेली दिसते !

( घागर उचलण्यासाठी वांकते. )

अनसूये, जरा इकडं ये ग. या प्रियंवदेनं ही कंचुकी बघ किती घट्ट बांधली आहे.

अन० :—या प्रियंवदेला कांहीच समजत नाही.

शकुं० :—इतकं घट्ट बांधायचं म्हणजे काय ! अगदी जख-डल्यासारखं झालं आहे.

प्रियं० :—अग, तुझं तारुण्य क्षणाक्षणाला तुझ्या उरोजांना उभार आणीत आहे. तेव्हा दोष द्यायचा, नांवं ठेवायचीं, चिडायचं तर त्या तुझ्या यौवनावर चीड ! माझ्यासारख्या गरीब मुलीवर कां ?

शकुं० :—पुरे, पुरे ! तुझ्या बोलण्याला कांही ताळतंत्रच नाही.

( परत आश्रमाकडे जाऊं लागते. )

**अन० :**—अग, चाललीस कुठं ? या आम्रवृक्षावर परवाच मोठ्या प्रेमानं त्याची स्वयंवर-वधू म्हणून ही वेल सोडलीस; 'वन-ज्योत्स्ना' म्हणून नांव ठेवलंस, त्या तुझ्या या आवडत्या वेलीला विसरलीस वाटतं ?

**शकुं० :**—गडे, एकवेळ माझा मला विसर पडेल, पण मी हिला विसरणार नाहीं. पहा कशी सुंदर जोडी शोभते आहे !

**अन० :**—कुठली ?

**शकुं० :**—हा आम्रवृक्ष आणि ही वेली ! कोमल आणि मनोहर फुलांच्या बहरामुळं यौवनांत आलेली ही वेली; आणि कोंवळ्या भरदार पालवीमुळं शोभणारा हा उपभोगक्षम आम्रवृक्ष !

**अन० :**—प्रियंवदे, हिला हें दृश्य कां आवडलं, कळलं का ?

**प्रियं० :**—नाहीं !

**अन० :**—अगदीच वेंधळी आहेस ! अग, या वेलीचं जसं तिला सुयोग्य अशा आम्रवृक्षाशीं मीलन झालं तसं मी माझ्या पतीशीं कधी एकरूप होईन असं वाटतंय् हिला.

**शकुं० :**—हें सगळं तुझ्या मनांतलंच आहे. चल ग प्रियंवदे !

( जाऊं लागते. तोंच जवळच्या वेलींतून एक भ्रमर उठतो. ती घाबरून किंचाळते. )

अगबाई, हें काय ! अग, हा भ्रमर पहा ! नवमालिकेला सोडून माझ्याच तोंडाभोंवती घिरट्या घालीत आहे. आता ! हा दुष्ट मेला

कांही केल्या थांबत नाही, बाई. प्रियंवदे, मला सोडवा ना ग !

प्रियं० :–अग, आम्ही कोण सोडविणार ? तपोवनांतील संकटं राजानं निवारण करायचीं असतात. राजा दुष्यन्ताला हांक मार !

शकुं० :– अगबाई, हा तर अगदी माझ्या राशीलाच लागला !

( राजा त्वरेने पुढे येतो. )

राजा :–कोण ? कोण त्रास देत आहे या मुनि-कन्येला !

( अनसूया भ्रमराला हांकलून देते. )

राजा :–काय झालं ?

प्रियं० :–कांही विशेष नाहीं. आमची ही सखी शकुंतला भ्रमराला पाहून घाबरली !

राजा :–(शकुंतलेला) फार नाही ना त्रास झाला ?

प्रियं० :–छे ! छे ! शकुंतले, पर्णकुटींत जा आणि पाहुण्यांच्या सत्कारासाठी पूजासाहित्य आणि फळं घेऊन ये.

राजा :–तुमच्या मधुर भाषणानं माझं आतिथ्य झालं. दुसरे उपचार कशाला !

प्रियं० :–बरं बाई, तसं का होईना ! पण महाराज, आपण प्रवासामुळं फार श्रमलेले दिसतां, तेव्हा त्या सप्तपर्णाच्या ओट्यावर कशी घनदाट छाया पसरली आहे ! घटकाभर बसून विश्रांति घ्या.

राजा :–मी प्रवासानं शिणलों आहे, आणि तुम्ही ! तुम्हीहि पाणी घालण्याच्या कामानं पुऱ्या दमलेल्या दिसतां ! या, तुम्हीहि बसा !

अन० :–शकुंतले, पाहुण्यांच्या शद्बाला मान द्यायला हवा. बसूंया

ना ? अग, अशी बावरल्यासारखं काय करतेस ? चल !

( सर्व बसतात. )

प्रियं० :— महाराज, आपल्यांला आम्हीं मुलींनीं कांही विचारलं, तर आपण आम्हांला उद्धट म्हणणार नाही असं आपल्या मधुर भाषणावरून वाटतं म्हणून विचारतें हो!

राजा :—हो, हो ! खुशाल विचार!

अन० :—आपल्या जन्मामुळं कोणतं राजकूल धन्य झालं ?

प्रियं० :—आणि आपण इकडं दूर आल्यामुळं कोणत्या देशाची प्रजा विरहानं झुरते आहे !

अन० :—आणि आपल्या सुकुमार देहाला तपोवनांत येण्याचे आपण कष्ट कां दिलेत ?

( राजा प्रथम गोंधळतो, पण लगेच कांही ठरवून बोलतो. )

राजा :—मी पौरव राजाचा धर्माधिकारी आहे. आश्रमांतील ऋषींचीं यज्ञकर्मे निर्विघ्नपणें चाललीं आहेत कीं नाही हें पाहण्यासाठी माझी नेमणूक आहे; त्यासाठी मी इकडं आलों.

प्रियं० :—राजा दुष्यन्ताचे अधिकारी ?

अन :—आता मात्र आम्ही धर्माचरणाच्या बाबतींत खऱ्या सनाथ झालों. होय ना ग, शकुंतले !

शकुं :—मला नाही माहीत !

प्रियं० :—अग, तू कांही बोल की ! अगदीच बोलायचं नाही म्हणजे ?

**राजा :**—माझ्या परकेपणामुळं तसं होणं स्वाभाविक नाही का ? पण त्यापेक्षा मला असं सांगा, कुलपति कण्वमहर्षि नैष्टिक ब्रह्मचारी आहेत ही गोष्ट सर्वांना माहीत आहे. आणि मग तुमची ही सखी त्यांची कन्या हें कसं काय ?

**प्रियं० :**—महाराज, राजर्षि विश्वामित्रांचं नांव आपण ऐकलंच असेल ?

**राजा :**—भगवान कौशिकांना कोण ओळखीत नाही !

**प्रियं० :**—मग तेच आमच्या सखीचे जनक !

**राजा :**—मग राजाच्या पोटीं जन्म घेऊन अशी तपोवनांत—?

**अन० :**—तीच तर नवलकथा ! विश्वामित्रांनी जन्मतांच हिला अरण्यांत टाकून दिली, तेव्हा हिचं संगोपन कण्वबाबांनी केलं. म्हणून ही त्यांची कन्या, आणि ते हिचे पिताजी.

**राजा :**—आपल्या 'टाकून दिली' या शब्दांनी माझ्या मनांत कुतूहल निर्माण झालं आहे. पहिल्यापासून कथा सांगा पाहूं.

**अन० :**—महाराज, राजर्षि विश्वामित्र गौतमी नदीच्या तीरीं मोठी तपश्चर्या करीत असतां देवांना काय मोठं भय उत्पन्न झालं, कुणाला ठाऊक; पण त्यांनी त्यांच्या तपाचा भंग करण्याकरिता मेनका अप्सरेला पाठवली !

**प्रियं० :**— महाराज, त्या वेळीं वसंतऋतु होता आणि मेनकेचं उन्माद उत्पन्न करणारं रूप पाहून— (लाजते).

**राजा**— समजलं ! एकूण ही अप्सरेची कन्या ! तरी मला

वाटलचं की इतकं मनोहर रूप पृथ्वीवरील स्त्रियांत कसं ! वीज आकाशांत जन्म घेते. तें सामर्थ्य भूमींत नाही.

( शकुंतला लाजून उठते. राजाहि उठतो. )

प्रियं० :– महाराज, आपल्या मनात आणखी काही विचारा– बयाच आहे वाटतं !

राजा :– हो, तुम्हीं बरोबर ओळखलं ! थोरांच्या जीवनाविषयी लोभनीय ओढ असतेच ना !

अन० :– हो ना !

राजा :– तुमची ही सखी नुसती पाहातच राहिली आहे. एक शब्दहि बोलत नाही, तेव्हा शंका अशी कीं आजच हें हिचं आश्रमीय मुनिव्रत ही विवाह होईपर्यंत पाळणार आहे की नेत्रसादृश्यामुळं हरिणींच्या सहवासांत ही जन्मभर तपोवनातच राहणार आहे ?

अन० :– महाराज, आम्ही आश्रमीय कन्या आहोत. धर्मा–चरणाच्या साध्या गोष्टींतहि आम्ही गुरुजनांच्या आधीन आहोत. तेव्हा—

प्रियं० :– आणि हिच्या लग्नाबद्दल म्हणाल तर हिला अनुरूप असा वर पाहून त्याला ही द्यायची असा कण्वबाबांनी नुकताच संकल्प बोलून दाखविला यांत काय तें समजा. होय की नाही, शकुंतले !

शकुं० :—अनसुये, मी जाते बाई.

अन० :—हें काय ! जातेस कुठं !

शकुं० :—ही प्रियंवदा काय हवं तें भलभलतं बोलते आहे, हें सगळं मी गौतमी आत्याला जाऊन सांगते की नाही ते पहा.

अन० :—हो, पण या पाहुण्यांचा आपण कांहीच सत्कार केला नाहीं, आणि त्यांना न विचारता असं मन मानेल तेव्हा निघून जाणं तुला शोभतं का ?

[ शकुंतला गोंधळते, व जाऊं लागते. प्रियंवदा तिला आडविते. ]

प्रियं० :—अहो, थांबा ! चाललांत कुठं ?

शकु० :—आश्रमांत !

प्रियं० :—आश्रमात ? तुमच्या पाणी घालण्याच्या दोन पाळ्या मी केल्या आहेत. आधी त्या ऋणांतून स्वतःला सोडवून घ्या आणि मग जा. चालल्या !

राजा :—अहो, ही आधीच पाणी घालण्यानं दमून गेली आहे. तेव्हा नका तिला आणखी शिणवूं ! तें, पहा, कलशभारानें तिचे स्कंद कसे गळून गेले आहेत; दोन्ही हातांचे तळवे लालबुंद झाले असून, अतिश्रमानं धाप लागल्यामुळं तिचं वक्षस्थळ पहा कसं कंपित होत आहे. कपाळावर घामाचे थेंब डंवरले असून, वेणीची गांठ सैल झाल्यामुळं स्वैरपणानं बागडणाऱ्या केसांना ती पहा कशी आपल्या हातांनी वारंवार सावरण्याचा प्रयत्न करीत आहे.

प्रियं० :—हो पण—

राजा :—मी तिला तुमच्या ऋणांतून मुक्त करतों, ही घ्या मुद्रिका.

[ आंगठी देतो. प्रियंवदा आंगठीवरील अक्षरें वाचते. ]

प्रियं० :–रा-जा-धि-रा-ज दु-ष्य-न्त ! म्हणजे ?

राजा :–माझ्याबद्दल भलती कल्पना करून घेऊं नका. ती मुद्रिका मला महाराजांनी भेट म्हणून दिली आहे.

प्रियं० :–तर मग ती आपल्याच बोटांत असलेली बरी. आपण सांगतां म्हणून मी हिला आपल्या ऋणांतून मुक्त करतें, मग तर झालं! गडे, आता बाई त हवी तिकडं जा.

शकुं० :–मला जा म्हणणारी किंवा अडवून धरणारी तू कोण ?

अन० :–अग ती जाईल पुष्कळ, पण पायांना चल म्हणायला तिचं मन आहे कुठं तिच्या स्वाधीन ?

( इतक्यांत पडद्यांत:– "अहो तपस्वी जनहो, आपल्या आश्रमीय पशुपक्षांचं रक्षण करा. राजा दुष्यन्त मृगयेसाठी आपल्या परिवारासह आश्रमाजवळ आला आहे, आणि त्याच्या रथाला बुजून तो पहा पिसाळलेला गजराज तपोवनाच्या परिसरांतून सैरावैरा धांवतो आहे." )

प्रियं० :–महाराज, या वार्तेनं आम्हांला भारी भीति वाटते. तेव्हा पर्णकुटींत परत जायला आम्हांला अनुज्ञा द्या.

राजा :–मला वाटतं माझा शोध करीत माझे सैनिक हिंडत असतील, त्यामुळं हा तपोवनाला उपसर्ग !

अन० :–महाराज, आमच्या हातून आपला व्हावा तसा सत्कार झाला नाही; तेव्हा आश्रमाला भेट द्या, असं म्हणायलासुद्धा आम्हांला संकोच वाटतो.

**राजा** :— छे ! छे ! तसं मनांत देखील आणूं नका. वस्तुतः तुमच्या भेटीनंच माझा खरा सत्कार झाला. आश्रमांतील कोणालाहि त्रास होणार नाहीं अशी व्यवस्था करतों आणि अवश्य आश्रमाकडे येतों.

( राजा एकवार शकुंतलेकडे पाहून जातो. ती मात्र त्याच्याकडे वारंवार पाहात असते. )

**शकुं०** :—अनसूये, जरा थांब बाई. हा पाहिलास ना दर्भांकुर, माझ्या पायात रुतला आहे तो ? तो तरी मला काढूं देशील ? अगबाई, आणि हें वल्कल आणखी कोरांटीला गुंतून राहिलंय.

[ राजा दूर गेलेला पाहून, ती मैत्रिणींसह जाते. ]

---

## प्रवेश २ रा

स्थळ- तपोवनांतील एक जागा

( राजाचा मित्र माधव्य, श्रांत असा प्रवेश करतो. )

**माधव्य** :—हुश्श ! दमलों बुवा. किती अफाट अरण्य हें ! जिकडं पहावं तिकडं झाडीच झाडी ! दिवसा रातकिडे ओरडतात, आणि वनचर तर धड्या-पासरीनं पळतात. 'हा काळवीट,' 'हें डुकर', 'हा वाघ', निदान 'हा ससा' असं ओरडत महाराज वनपशूंच्या मागे धांवतात; आणि मी त्यांच्यामागून ! पण ही पाठशिवणी मला भिक्षुकाला सारखी कशी साधणार ! दमलोंच् काय !

( झटकन् खालीं बसतो. इतक्यांत दमनक येतो. )

**दम० :**—काय, भटजी महाराज! इथं बसलात होय! किती धुंडाळायचं! चला, महाराज बोलवताहेत!

**माधव्य :**—तरी बरं, आठवण तरी ठेवलीत! ये, बाबा दमनका, ये! तूं तरी बरा भेटलास! मला वाटलं माणूस कोटींतील कोणी प्राणी आता या जन्मांत तरी दिसतो की नाही? अरे, काय आयुष्य हें!

**दम० :**—सगळं खरं! पण बोलायचं कुणी महाराजांना तुम्ही बोला की.

**माधव्य :**—नाही, आता मी बोलणारच. बघ तर कशी गम्मत करतो. चल! ( जातात. )

---

## प्रवेश ४ था

स्थळ- आश्रमाचें प्रवेशद्वार

( राजा अस्वस्थ असा प्रवेशतो. )

**राजा :**— शकुंतलेला पाहिल्यापासून मन कसं विचलित झालं आहे. त्या मुनिकन्येची प्राप्ती सुलभ नाही हें पटत असूनहि, माझं वेडं मन तिच्या विचारापासून परावृत्त करणं मला जमत नाही; कारण त्या सुंदरीचे नाना भावविलास माझ्या मनाच्या आकांक्षा वाढवितात. ती जरी माझ्याशीं बोलली नाही, तरी माझं बोलणं किती आत्मीयतेनं ऐकत होती!

काय गंमत आहे ? कामी माणसाच्या मनाची ठेवणच अशी असते की, प्रेमाचं साफल्य झालं नाही तरी आपल्या आवडत्या माणसाची स्वतःला इष्ट अशी वृत्ति कल्पून, तो आपली गोड फसवणूक करून घेत असतो.

(इतक्यांत पडद्यांतून ओरडत, माधव्य दमनकासह प्रवेशतो.)

**माधव्य :--** मेलों ! महाराज, मेलों ! आता मी कांही जगत नाहीं ! सांधेन-सांधे धरले माझे !

**राजा :–** अरे काय ! झालं काय ?

**माधव्य :–** वा-रे, माझ्या राजा ! दुसऱ्याच्या डोळ्यांत बोट घालावं आणि वर त्यालाच 'कां रडतोस' म्हणून विचारावं ?

**राजा :–** म्हणजे काय ?

**माधव्य :–** हें पहा, नदीच्या कांठीं वेत उगवतात– वेत ! भले उंच आणि हे दांडगे !! ते वृद्धांसारखे कमरेंत वांकलेले दिसतात ते स्वतःच्या गुणानं की नदीच्या वेगानं ?

**राजा :–** नदीच्या वेगानं !

**माधव्य :–** मग मित्रराज, ही आमची अशी अवस्था व्हायला आपणच कारण आहांत.

**राजा :–** मी ?

**माधव्य :–** हो, तुम्ही ! अहो राजन्, तुमच्यामागून धांवून धांवून अगदी टेकीला आलं आहे हें शरीर ! याला कारण कोण ? अहो, महाराज ! पुरे आता मृगया ! बस्स झाली ! एक दिवस तरी

विश्रांती घ्या . अहो, मी तुम्हाला विचारतों आहे आणि तुम्ही तिकडं कुठं पाहतां ? म्हणजे आमचं बोलणं हें अरण्यांत ढसढसा रडण्यासारखं झालं की !

राजा :– दमनका, हा माधव्य आज विश्रांती घ्यावी म्हणतो.

दमनक :– भलतंच ! महाराज, मृगयेतलं त्यांना काय समजतंय !

माधव्य :– अरे, मृगयेचं अवसान भरविणाऱ्या, तोंड देखलं बोलूं नको ! गुलामा, हांक्या घालीत अरण्यांतून पळतांना, माणसाची नाक खाण्यासाठीं चटावलेल्या एखाद्या जरठ अस्वलाच्या तोंडांत पडशील याचा विचार कर !

दम. :– तें भय तुम्हांला.

राजा :– दमनका, कां छळतोस त्याला ? गरीब बिचारा ब्राह्मण कंटाळला धांवपळीला.

माधव्य :– बघ, लेका; राजाला समजतंय, आणि त्याला कळत नाही !

राजा :–जा, सर्वांना सांग— मृगया संपली म्हणावं. विश्रांती घ्या.

दम. :– आज्ञा !

माधव्य :– कां रे, जिरली का नाहीं ? मृगयेचं कौतुक करतोय

(दमनक जातो, माधव्य ओ घावर ऐसपैस पडतो.)

राजा :– अरे, तू अगदीं डोळे मिटून पडलास की !

**माधव्य :–** डोळे उघडे ठेवून पाहण्यासारखं काय आहे इथं !

**राजा :–** तेंच तूं पाहिलं नाहीस ! फारच सुंदर ! अतिरमणीय !

**माधव्य :–** तुमच्याशिवाय दुसरं सुंदर तें काय ! तें तर समोरच आहे.

**राजा :–** आपलीं माणसं सर्वानाच सुंदर दिसतात, पण आश्रमाला ललामभूत अशी ती महर्षिकण्वांची शकुंतला !

**माधव्य :–** हां ! असल्या भलत्या गोष्टींत आपण कांही तुम्हांला प्रोत्साहन देणार नाहीं. अहो, ती ऋषिकन्या ! तुम्हांला कांही तिच्याशीं लग्न करतां येणार नाही !

**राजा :–** मित्रा, पुरुराजाचे वंशज आम्ही ! निषिद्ध गोष्टी आमच्या हातून होतील कशा !

**माधव्य :–** मग तिचं ध्यान कशाला करतां !

**राजा :–** अरे, ती कण्वांची खरी कन्या नव्हे ! राजर्षि विश्वामित्रांची आणि देवलोकीच्या अप्सरेची – मेनकेची – ती कन्या ! जन्मतःच तिचा त्याग करून तीं दोघं गेलीं, आणि जसं एखादं जाईचं फूल रुईच्या झाडावर पडावं–

**माधव्य :–** तसं ती त्या म्हाताऱ्या कण्वांना सांपडली, त्यांनी तिला पाळली, मोठी केली आणि तुम्ही पाहिली !

**राजा :–** नुसती पाहिली नाही, तिच्याशीं बोललों देखील. फारच सुंदर ! मित्रा, भगवान ब्रम्हदेवांनी जगांतील सौंदर्य मनांत कल्पून, तिचं परमरमणीय रूप रेखाटलं आणि मगच त्यांत प्राण ओतला असावा.

**माधव्य :—** नेहमी खजूर चापणाऱ्या ब्राह्मणाचं जसं चिंचेवर मन जातं, तसं राजवाड्यांतल्या एकापेक्षा एक सुंदर राण्यांशीं विलास करणारे तुम्ही,— तुमची ही वासना अगदीच आंबटशोकी दिसते.

**राजा :—**तिला तूं पाहिलं नाहीस म्हणून असं म्हणतोस !

**माधव्य :—**असं ? बरं, तुमचं तिच्यावर मन बसलं ! पण तिचं ? तिची निदान प्रेमदृष्टी ?

**राजा :—**अरे वेड्या, तपस्व्यांच्या मुली मुळांत भोळ्या असतात; तरीसुद्धा—

> माझी नजर चुकवून ती चोरट्या नजरेनं माझ्याकडं पाहात होती; काहीतरी निमित्त काढून गालातल्या गालात हंसत राहिले ती, मी तिला स्पष्ट पाहिलो; आणि विनयामुळं तिनं माझ्या विषयींचा आपला प्रेमभाव उघड दर्शविला नाही, तरी पूर्णतः लपवूनहि ठेविला नाही.

**माधव्य :—**मग, यापेक्षा आणि काय तिनं लगेच तुमच्या मांडीवर येऊन बसावं म्हणतां ? वः ! तुम्हीं तर या तपोवनाचं राजोद्यान करून सोडलंत ! तेव्हा आता वेळ नको. मरा दौड ! नाहीतर एखाद्या अरसिक तपस्व्याच्या हातीं ती पडेल.

**राजा :—**हो, पण इथले सारे तपस्वी मला ओळखतात. तेव्हा पुनः आश्रमांत कसं जातां येईल याचीच विवंचना लागली आहे. त्याला कांही युक्ती काढ !

**माधव्य :—**तुम्ही तर पृथ्वीपति, तुम्हांला कशाला—

**राजा** :--नाही, नाही. तें युक्त नव्हे ? कांहीतरी निमित्त पाहिजे.

**माधव्य** :--निमित्त पाहिजे !

( दोघे सचिंत बसतात. इतक्यांत दोन ऋषींसह येतो. )

**१ ला ऋषि** :--राजा, तुझा जयजयकार असो !

**राजा** :--आपल्याला मी अभिवादन करतों. काय आज्ञा आहे ?

**२ रा ऋषि** :--राजन्, कण्वमहर्षि सांप्रत आश्रमांत नसल्यामुळं राक्षस आमच्या यज्ञकार्यांत विघ्न आणीत आहेत. तेव्हा यज्ञसमाप्ती-पर्यंत आपण आश्रमात राहावं, अशी ऋत्विजांची आपल्यांला विनंती आहे.

**राजा** :-- हा तर माझ्यावर अनुग्रह ! आपण पुढं व्हा ! मी माझ्या अनुचराची पाठवणी करून आलोंच.

( ऋषि जातात. )

**दम०** :--महाराज, राजधानीकडून प्रभूंच्या मातुश्रींनी निरोप धाडला आहे.

**राजा** :-- बोल !

**दम०** :--मातुश्रींची आज्ञा आहे की आजपासून चौथ्या दिवशीं त्यांच्या व्रताचं उद्यापन आहे. तेव्हा त्या दिवशीं महाराजांनी अवश्य उपस्थित राहावं.

**माधव्य** :--अरे, राहावं काय ? राहिलंच पाहिजे ! चला ! अहो, आता आणि विचार आहेच का ?

**राजा** :--इकडं तपस्वीजनांचं काम, आणि तिकडं गुरुजनांची आज्ञा ! दोन्हीहि साधली पाहिजेत. काय करावं ?

**माधव्य** :--त्रिशंकू राजाप्रमाणं अधांतरींच लोंबकळत राहावं.

**राजा :**–मित्रा, असं करूं या; मातृश्रींनी तुला पुत्र मानलंच आहे. तेव्हा तूं राजधानीला जा, आणि मी इथं मुनिवर्यांच्या कामांत गुतलों आहे हें मातृश्रींना सांगून पुत्र म्हणून मी जें करावयाचं तें तूं कर म्हणजे झालं !

**माधव्य :**–ठीक आहे, मी जातों ! हो, पण मी राक्षसांना भितों म्हणून पाठवीत असलांत तर आपण जाणार नाहीं. तुम्ही जा ! मी राक्षसांचा निःपात करून येतों. मला भटाला कसलं आलं आहे राक्षसांचं भय ?

**राजा :**–कोण म्हणतो तसं ? दमनका, तुम्ही सारे याच्याबरोबर राजधानीला निघा.

**दम० :**–आज्ञा !

( दमनक जातो. )

**राजा :**–मित्रा, जरा इकडं ये ! हें पहा, मी जें मघा बोलतों

**माधव्य :**–कशाबद्दल ?

**राजा :**–त्या ऋषिकन्येबद्दल !

**माधव्य :**–हां हां ! त्या शकुंतलेबद्दल !

**राजा :**–तें सारं चेष्टेनं, खरं कांहीच नाही त्यांत !

**माधव्य :**–तें सारं चेष्टेनं, खरं कांहींच नाही त्यांत ?

**राजा :**–कांहीच नाही. हो, नाहीतर ते खरं मानून गमतींत येशील आणि अंतःपुरांत बोलून जाशील ! कारण असं पहा– कुठं आम्ही आणि कुठं हरिण-बालकांच्या समवेत रानावनांत वाढलेली, प्रेमभावनेची किंचितहि ओळख नसलेली, एखादी मुनिकन्या !

**माधव्य** :–समजलं ! तें सारं मीं विसरायचं ! आलं लक्षांत, आता आज्ञा ?

( जातो. )

**राजा** :–मना, असा उतावीळ कां होतोस ? संशयाचं निराकरण होऊन ती क्षत्रिय कन्या आहे, हें निश्चित झालं. ज्याला स्पर्श करणं युक्त नव्हत, तो अग्नि नसून एक तेजस्वी रत्न आहे असं ठरलं. मग आता अभिलाषेची इतकी तीव्रता कां ? पुन: तेच विचार ! जलाशयाच्या अगदी तळाला गेलेलं जल जसं पृष्ठभागावर क्वचित् येतं, तशी या सुंदरीनं हिरावून नेलेली माझी चित्तवृत्ति पुनरपि ताळ्यावर कधीच येणार नाही का ?

(इतक्यांत पडद्यांत– भीषण आरोळ्या, गडबड-गोंधळ उडालेला ध्वनि ऐकूं येतो व— " राजा, यज्ञकार्याला प्रारंभ झाल्याबरोबर प्रज्वलित यज्ञकुंडाभोंवती राक्षसांच्या काळ्या कभिन्न छाया इतस्ततः हिंडतांना दिसत आहेत. " )

**राजा** :–हा पहा मी आलोंच !

( राजा धनुष्य–बाण घेऊन जातो– पडदा पडतो. )

**[ अंक १ ला समाप्त ]**



# अंक दुसरा

## [ प्रवेश १ ला ]

( स्थळ—आश्रमांतील एक पाऊलवाट; राजा प्रवेश करतो. )

**राजा** :—यज्ञयाग निर्विघ्नपणें समाप्त झाल्यामुळं ऋत्विजांनी मला राजधानीला जाण्याविषयी अनुज्ञा दिली खरं, पण शकुंतलेच्या अभिलाषेनं परत जाण्याचा विचारहि मला मानवत नाही. गेले दोन दिवस एखाद्या छांदिष्ट कोडग्याप्रमाणं मी आश्रमाच्या परिसरांतून हिंडतो आहे. पण माझ्या मनहरणीचं दर्शन होत नाही; हा त्यांतला दुर्दैवाचा भाग!

> मदना, तूं आणि चंद्र, दोघेहि आम्हां प्रेमिकाचें विश्वासस्थान असतांना, तुम्ही मात्र आमची वृथा वंचना करतां. कंदर्पा, तुझे बाण पुष्पाचे आहेत, असं सूज्ञ आणि कविजन म्हणतात. पण माझ्या अंतःकरणाला ते वज्राच्या कठोरतेनं भेदून जात आहेत. त्या पुष्पांत हें काठिण्य कोठून आलं? आणि चंद्राची शीतल प्रभाहि मला अग्निसारखी दाहक भासते.

पण हें सारं त्या मदिराक्षीच्या निमित्तानं असेल तर कामदेवा, तुमचे हे तीक्ष्णप्रहारहि सुखद मानून, रात्रंदिवस होणाऱ्या यातना मी सहन करीन! कुठं बरं असेल ती!

( जाऊं लागतो, समोर पडद्यात पाहून आनंदित होतो. )

अरे, वा! माझी प्रिया! माझ्या नेत्रांचं पारणं फिटलं! पण ही आज अशी कमलपुष्पांच्या गारेगार शय्येवर का विश्रांती घेत आहे? आणि हिची मुद्राहि किती म्लान! उष्ण वाऱ्यानं जिची पानं वाळून गेलीं आहेत अशा मोगरीची वेलच जणूं! मदनाचा आणि वाढत्या उन्हाचा ताप सारखाच असतो हें खरं, पण उन्हाची पीडा तरुणींना इतकी सुंदर करून सोडीत नाही. खात्रीनं ही मदनव्यथाच! पण ती मला उद्देशून असेल का?

( जातो. )

---

## [ प्रवेश २ रा ]

( स्थळ– लतामंडप, शकुंतला ओट्यावर पहुडली असून मैत्रिणी तिची सेवा करीत आहेत. )

**अन० :**–सखे, या कमल-पत्राच्या पंख्यानं आम्ही तुला वारा घालतों आहोंत, त्यानं तुला अंमळ बरं वाटतं आहे ना?

**शकुं० :**– काय तें? तुम्ही वारा का घालतां आहांत?

**अन० :**–आता म्हणजे!

**शकुं० :**–अनसूये, पुरे बाई, खरंच किती कष्ट होतात तुम्हांला! पण हा अंतरींचा दाह कांही कमी होत नाही बाई!

प्रियं० :– आता बाई शर्थ झाली तुझ्या दमवण्याची !

अन० :– सखे, एक विचारूं ? अगदी खरं खरं सांगायला हवं हं ?

शकुं० :– तुमच्यांपासून कांही चोरून का ठेवितें मी कधी ?

प्रियं० :– मग गडे, मदनबाधा की काय म्हणतात ना, त्यानं काय होतं तें नाही मला माहीत; पण मी कथा–पुराण ऐकलीं आहेत ना, त्यावरून तशीच काहीतरी तुझी अवस्था दिसते. साग तुला काय होतेय ?

अन० :– अग रोगाची परीक्षा चांगली झाली नाही, तर उपचार तरी कशावर करावयाचे ?

प्रियं० :– हें बघ, किती वाळलीस तूं ! लावण्याची टवटवी काय ती बाकी उरली आहे. एरवी किती थकलीस !

शकुं० :– तुमच्यांशिवाय कुणाला सांगूं आपलं दुःख ! पण सांगितलं तर तुम्हांला मात्र माझ्याबरोबर विनाकारण कष्ट होतील.

प्रियं० :– अग, म्हणूनच सांगितलं पाहिजे. आपलं दुःख मायेच्या माणसांना सांगितलं म्हणजे थोडंफार हलकं होतं म्हणतात. सांग, लाजूं नकोस.

शकुं० :–सख्यांनो, त्या दिवशीं– तो तपोवनाचं रक्षण करणारा राजा– त्यांना पाहिल्यापासून–

( मैत्रिणी एकमेकींकडे पाहातात. झाडाआड असलेल्या राजाने हें सारं संभाषण ऐकलेलं असतें. )

शकुं० :– सख्यांनो, माझा राग नाही ना आला तुम्हांला ?

अन० :–अग, भलतंच काय बोलतेस ? उलट तुझं योग्य ठिकाणी चित्त गेलं, याबद्दल आम्हांला आनंदच झाला.

शकुं० :–मग त्या राजश्रींना माझी करुणा येईल असं कांही करा. नाहीतर सोडा माझ्या जीवाची आशा !

प्रियं० :–अनसूये, हा पल्ला आता इतक्या थराला जाऊन पोहोंचला की, कांही पर्याय म्हणून राहिला नाही.

अन० :–त्यांतल्या त्यांत हिचं ज्याच्यावर चित्त गेलं, तो पुरुवंशाचं भूषण आहे, हें भाग्य म्हणायचं. महानदी सागरालाच मिळायची आणि मोतियाची वेली आम्रवृक्षावरच चढायची !

प्रियं० :–मग हिचा हेतु सिद्धीला जाईल अशी कांही युक्ती काढ ! काम फार त्वरित आणि कुणालाहि न कळतां व्हायला हवं.

अन० :–( विचार करून ) माझं म्हणणं, शकुंतलेनं एक प्रेमपत्र लिहावं, आणि तें प्रसादाच्या निमित्तानं राजाकडं पोहोचविलं की झालं !

प्रियं० :–हो, पण हिचं काय म्हणणं आहे तें नको का पाहायला ?

शकुं० :–तुम्हांला जें आवडतें तें मी नाकारतें का कधी ? पण माझ्या पत्राचा ते अव्हेर तर करणार नाहीत !

प्रियं० :–ही कसली शंका ? तुला तुझ्या रूपगुणाची कल्पना नाही म्हणून असं वाटतं ! आपल्या अंगावर शरदृतूंतील चंद्राचं

चांदणं पडूं नये म्हणून कोणी त्याच्याआड वस्त्र धरील का ? तुझ्या-सारखी स्वरूपसुंदर युवती स्वतः होऊन प्रेमाराधन करूं लागली, तर तें प्रेम तो राजा झिडकारील ! वेडी ग वेडी !

**अन० :**—चल, आपण त्या लता मंडपांत बसूं. हें घे. पोपटाच्या पोटाप्रमाणं नाजूक असलेल्या या कमलपत्रावर आपल्या नखाग्रांनी कोरून प्रेमपत्र लिहीं.

( सर्वजणी लतामंडपांत जातात, राजा पुढे येतो. )

**राजा :**— या सुंदरीचं माझ्यावर नितांत प्रेम आहे हे निश्चित ! किती रमणीय ! माझी मनहरणी प्रेमपत्र लिहीत आहे. तिची ती किंचित् मुरडलेली भुवई, किती लोभनीय ! आणि गाल ? गाल पहा कसे माझ्यावरच्या प्रेमानं लज्जागर्भ दिसत आहेत. अगदी तिच्याकडं अनिमिष नेत्रांनी पाहात राहावंस वाटतं.

( दचकून मागे सरतो. पडद्यांत :— " बसूं, बसूं ! " नंतर प्रियंवदा कमलपत्र हातीं घेऊन प्रवेश करते. मागोमाग शकुंतला व अनसूया येतात. राजा बाजूला उभा आहे. त्याच्याकडे त्यांचं लक्षच नाही. तोहि किंचित मागे सरतो. )

**शकुं० :**—सखे, अर्थवाहक आहे ना ?

**अन० :**—ऐकव ना ? वाच !

( प्रियंवदेकडून शकुंतला कमलपत्र घेऊन वाचते. )

**शकुं० :**—महाराज, तुमच्या चित्तीं काय आहे हे मी कसं सांगूं ? पण माझ्या अंतःकरणांतील साऱ्या भावना मात्र तुमच्या प्राप्तीसाठी आतूर

झाल्या आहेत. आणि हा मदन रात्रंदिवस मला कष्ट देतो आहे. तेव्हा निर्दया, नको माझा अंत पाहूं.

( राजा प्रकटपणें पुढे येतो. )

**राजा** :--चारुगात्रि, मदन तुला कष्टच देतो आहे; पण मला मात्र तो एकसारखा जाळीत आहे. सूर्य जेवढा चंद्राला निष्प्रभ करतो, तेवढा कुमुदिनीला करीत नाही. तिला केवळ तो सुकवितो.

( राजाच्या या अचानक प्रगट होण्यानें सर्वजणी गोंधळून जातात. )

**शकुं०** :--प्रियंवदे !

**प्रियं०** :--महाराज, आपलं आगमन किती वेळेवर ! आमच्या सखीच्या मूर्तिमंत मनोरथाचं स्वागत हो, स्वागत !

**शकुं०** :--सखे, मी जातें बाई !

**राजा** :--कशाला कष्ट घेतां ! हें पहा, तुम्ही आधीच थकला आहांत; कमलतंतूप्रमाणं नाजूक असलेलं तुमचं अंगन्‌अंग विकाळित झालं आहे. तीं फुलं सुद्धा तुमच्या देहांत रुतलेलीं दिसतात. तेव्हा शिष्टपणाची मर्यादा संपविलेली बरी नव्हे का ? शिवाय आता हें सौजन्य तुम्हांला साहवणार तरी कसं ?

**शकुं०** :--हो, पण—

**प्रियं०** महाराज, तुम्हां उभयतांचं एकमेकांवर किती प्रेम आहे, हें सांगायला हवं असं नाही. पण ही आमची मैत्रिण आहे म्हणून आम्हांला बोलावं लागत !

**राजा** :–बोला ! मनांतली गोष्ट मनांत ठेवली त्यापेक्षा ती बोलली असती तर बरं झालं असतं, असा मागाहून ताप होतो. बोला !

**प्रियं०** :–महाराज, आमच्या सखीची भगवान कामदेवानं काय अवस्था केली आहे हें तुम्ही पाहातांच, तेव्हा तें दुःख आपणच दूर करायला हवं. कारण त्याला कारण आपणच आहांत.

**शकुं०** :–प्रियंवदे, राजश्रींना राजधानी सोडून कितीतरी दिवस झाले असतील. अंतःपुरांतील सुखाची आस त्यांना लागली असेल. त्यांना कशाला अडवितेस ? त्यांना जाऊं दे ?

**राजा**:–मदिराक्षि, आधीच मदनबाणांच्या प्रहारानं व्याकूळ झालेल्या माझ्या मनाला, असा दुजाभाव धरून नको छळूंस !

**प्रियं०** :– हो, पण महाराज—

**राजा** :–यापुढं माझ्या कुलाची तूंच काय ती एकमेव प्रतिष्ठा. हें वचन !

**प्रियं०** :– अनसूये, अग तें बघ ! हरिण-बालक कसं बावरलंय. सारखं इकडं तिकडं पाहातंय. आपल्या आईला शोधतंय वाटतं. चल आपण त्याला तिच्याकडं नेऊन पोहोचवूं !

**शकुं०** :–अग, तुम्ही दोघी निघालांत ? मग इथं माझ्या रक्षणाला कोण ? निदान एकतरी रहा !

**प्रियं०** :–काय मेलं बोलणं तरी ? अग, पृथ्वीचं रक्षण करणारे एवढे महाराज आहेत तुझ्या रक्षणाला, आणि म्हणे कोणीतरी एकजण रहा. भारीच भित्रा बाई स्वभाव तुझा.

( जातात. )

**शकुं०** :–अगबाई, या गेल्या की !

**राजा** :–घाबरूं नको. हा दास तुझ्याजवळ आहे ना ? लावण्य-लतिके, या कमलपत्राच्या पंख्यानं तुला गार वारा घालूं की कमल-दलाप्रमाणं, लालसर असलेले तुझे पाय चुरूं ?

**शकुं०** :–इश्श ! हें काय ? ज्यांचा मानानं सन्मान करायचा, त्यांच्याकडून अशी का सेवा घ्यायची असते ?

**राजा** :–मग अशी शांत चित्तानं इकडं ये. बैस अशी ! तिकडं ग्रीष्मऋतूच्या उन्हाचा कोण ताप ? आणि तशांत तुझ्या शरिराची अशी अवस्था झालेली !

( तिला जवळ घेऊन ओट्यावर जाऊन बसतो. चुंबनासाठी तो अधीरपणें तिला जवळ ओढतो. ती चटकन त्याच्यापासून दूर होते. )

**शकुं०** :–महाराज,—

शालीनता सोडूं नका ! आणि मी जरी प्रेमभावनेनं तुमच्यावर अनुरक्त असले तरी माझं मला स्वच्छंदानं कसं वागतां येईल ? गुरुजनांच्या अनुज्ञेशिवाय असं वागणं, तुह्मांला आणि मलाहि सुखावह असलं तरी मी असं विनयहीन वर्तन कशी करूं ?

( राजा पुनः तिला जवळ घेतो. )

**शकुं०** :– निदान माझ्या मैत्रिणींना तरी मला विचारूं दे. सोडा, महाराज !

**राजा** :– सोडीन, पण केव्हा ! पुऱ्या फुललेल्या फुलाचा मधु चाखल्याशिवाय भ्रमर त्या पुष्पाला सोडतो का कधी ?

**शकुं० :**– काय हें ?

( तिचें तो चुंबन घेणार तोंच पडद्यांत "हे चक्रवाकी, आपल्या प्रियकराचा निरोप घे. ही पहा संध्या आली." गौतमी:– शकुंतले ! बाळ, कुठं आहेस तं ? )

**शकुं० :**–महाराज, माझ्या समाचारासाठी गौतमी आत्या येत आहेत. आपण तिकडे जरा लतामंडपांत लपावं.

( राजा लपतो. गौतमी व मैत्रिणी येतात. )

**प्रियं० :**–आत्याबाई, ती पहा तिकडे आहे शकुंतला !

**गौतमी :**–बाळ !

**शकुं० :**–आत्या !

**गौतमी :**–माझी बाई ती ! आता थोडं बरं वाटतंय ना ? काय दशा झाली ग हिची ?

**प्रियं० :**–हो, अगदी कोमेजलं हे मालतीचं फूल !

**अन० :**–पण आता थोडी टवटवी आल्यासारखी दिसते खरी !

**शकुं० :**–आत्या, आतां मला पुष्कळच बरं वाटतंय !

**गौतमी**–अग वाटेल, वाटेल तर काय झालं ? चल, दिवस मावळायला आला, पर्णकुटींत चल ! सायंप्रार्थनेची वेळ झाली, चला ग साऱ्या जणी.

( जाऊं लागते. )

**शकुं० :**–संतापहारक लतामंडपा, तुझ्यापासून मला पुष्कळ

सुख झालं; तसंच सुख भोगण्यासाठी मी पुन: येण्याच्या इच्छेनं जात आहे.

**गौतमी** :—काय ग, काय बडबडते ही? लतामंडप काय? सुख काय?

**प्रियं०** :—अहो आत्या, लतामंडपांत विश्रांती घेतल्यामुळं हिला बरं वाटलं ना, म्हणून म्हणते!

**गौतमी** :—एवढंच ना? अग, मग उद्या अगदी प्रातःकाल-पासून येऊन बैस! लतामंडप पळून का जातो आहे? हं चला!

( सर्व जातात. राजा लतामंडपांतून बाहेर येतो. )

**राजा**:—कोणतीहि गोष्ट सफल होण्यासाठी जितकी जास्त धडपड करावी, तितकीं आपल्यांला जास्त विघ्नं येतात. लतामंडपा, तुला सोडून मी इतरत्र कुठं जाऊं? ही माझ्या सखीची कोमेजलेली पुष्पशय्या, इथं शिलेवर पसरलेली आहे; प्रियेच्या मनगटांतून गळून पडलेलं, कमळपुष्पांच्या देठांचं कंकण इथं आहे; हें कमलपत्रावरचं नखाग्रांनी कोरलेलं प्रेमपत्र; आणि या सर्वांच्या दर्शनानं विद्ध झालेला मी; मी इतरत्र कुठं जाऊं!

( हळू हळू लतामंडपाकडे जातो. प्रकाश कमी कमी होतां होतां अंधार होतो. चंद्र उगवून वर येऊं लागतो. थोड्याच वेळांत शकुंतला प्रवेशते. राजा लतामंडपांतून बाहेर येतो. ती त्याला पुष्पहार घालते— पडदा पडतो. )



## [ प्रवेश २ रा ]

[ स्थळ– तपावनांतील एक स्थान. अनसूया व प्रियंवदा प्रवेश करतात. ]

**अन० :**–चल बाई लवकर ! तुझा नेमधर्म होईल, पण तिकडे कण्वबाबा शकुंतलेच्या समाचारासाठी येतील आणि आपण तिथं नसणं–

**प्रियं० :**–आज सहा मासांनंतर दर्शन होत आहे गुरुजींचं, पण धीर कसा तो होत नाही भेटायचा. त्यांतून तीहि बिचारी काळजींत झुरणीला लागली आहे.

**अन० :**–अग, झुरणीला न लागेल तरच नवल ! त्या राजाशीं तिचा गांधर्व-विवाह झाला; आणि निरोपाचं आश्वासन देऊन तो राजधानीला गेला, त्याला आज चार महिने झाले,— ना निरोप ना बोटभर पत्रिका ! शिवाय आता ती गर्भवती आहे.

**प्रियं० :**–मला संसारांतलं कांही कळत नाही, पण त्या राजानं शकुंतलेशीं प्रतारणा केली एवढं मात्र नक्की कळतं.

**अन० :**– नाही, नाही ! त्याच्यासारख्याच्या हांतून असलं अवगुणीकृत्य व्हायचं नाही. मला वाटतं दुर्वासांच्या शापामुळं तो विसरला असावा.

**प्रियं० :**–शाप कुणाला ? शकुंतलेला ? कां पण, आणि केव्हा तो ?

**अन० :**–झाले त्याला चार महिने. तो राजा गेला ना, त्यानंतर दोनच दिवसांची गोष्ट ! त्या दिवशीं दुर्वास ऋषि आश्रमांत आले, पण पतिविरहामुळं भानावर नसलेल्या शकुंतलेला त्यांचं स्वागत करण्याचं

अवधान राहिलं नाही –

प्रियं० :–झालं ! आधीच तसले आणि–

अन० :–हो, एकदम संतापून दिलान् शाप त्यांनी, ' अतिथीचा अपमान करणारे मूर्ख पोरी, तं ज्याचं अनन्यभावानं चिंतन करीत आहेस तो तुला पुरा विसरून जाईल ' !

प्रियं० :–दुर्वासांचा शाप कधी खोटा होईल ? म्हणून विसरला ग बाई राजा !

अन० :–नंतर मी त्यांचे पाय धरले. विनवून, शकुंतलेच्या अनावधानाचं कारण सांगितलं तेव्हा निवळले आणि उश्शाप दिला की, त्या राजानं शकुंतलेला जातांना आठवण म्हणून दिलेली एखादी वस्तु त्याला दाखविली, की शापाचा प्रभाव संपेल म्हणून.

प्रियं० :–एवढंच ना ? राजानं जातांना आठवण म्हणून आपली मुद्रिका दिली आहे. आहे तिच्या बोटांत. अग, पण हें यापूर्वी नाही का बोलायचं ? ती आता गर्भवती आहे. त्या राजाकडं मुद्रिका पाठवून,सारं नसतं का जमवतां आलं सुसूत्र ?

अन० :–मला धीर कसा तो होत नव्हता, आणि अशुभ-गोष्टींत कालहरण करावं म्हणतात ना ?

( शारद्वत प्रवेश करतो. )

शारद्० :–अग, तुम्ही दोघी इथंच ? तिकडं कण्वबाबा सर्वांना दर्शन देऊन, शकुंतलेच्या पर्णकुटींत देखील गेले, जा लवकर !

अन० :–बघ, सांगितलं नव्हतं मीं तुला ? चल बाई.

( शारद्वत् जातो. त्या जाण्यासाठी निघतात. तोंच आनंदाने मह्रून गेलेली शकुंतला प्रवेशते. )

**शकुं०** :—सख्यांनो, माझे बाबा किती चांगले आहेत.

**प्रियं०** :—म्हणजे ! सांगितलंस त्यांना ?

**शकुं०** :—गौतमी आत्यांनी आधीच सांगितलं होतं. मी घाबरून, लज्जेनं चूर होऊन उभी होते, पण बाबांनी मला प्रेमानं जवळ घेतलं, कुरवाळून धीर दिला.

**अन०** :—बरं झालं बाई ! मला वाटलं होतं, समजल्यावर काय म्हणतात काय की ?

**प्रियं०** :—जाऊं दे ग. कांही झालं नाही ना ! शेवट चांगला व्हायचा असला म्हणजे सगळं कांही चांगलंच घडतं.

**अन०** :—चला, आता त्या राजाचा निरोप आला की चालल्या महाराणी राजधानीला.

( गौतमी प्रवेश करते. )

**गौतमी** :—प्रियंवदे ! अग, हिला घेऊन चला आश्रमांत. मी हिच्या ओटीभरण्याची सिद्धता करतें. अग, हिला हास्तिनापुरला तिच्या नवऱ्याकडं धाडायचं ठरविलं आहे गुरुजींनी.

**प्रियं०** :— आज ?

**गौतमी** :—हो, आजच ! अग, त्या राजाच्या निरोपाची वाट पाहण्यापेक्षा आपणच हिला सासरीं धाडणं बरं, असं म्हणणं पडलं गुरुजींचं. हिला आता पांचवा महिना लागणार. राजघराण्याच्या

रीतीप्रमाणं सारे संस्कार गर्भावर व्हायला नकोत का? मग? लवकर या.

( जाते. )

**प्रियं०** :–अनसूये, ही आज सासरीं जाणार, हें ऐकून मनाला कशी हुरहूर लागली आहे.

**अन०** :–आमची हुरहूर जाईल मेली कशीतरी. पण आधी हिच्या सुखाचं बघ!

**प्रियं०** :–शकुंतले, चल गडे; आम्हांला तुझ्या वेणींत या वेण्या माळूं देत.

**शकुं०** :–सख्यांनो,—

आज तुम्ही मला नटवीत आहांत. पण उद्या? उद्या हें सुख कुठलं? आजवर तुम्ही माझ्यावर नितांत प्रेम केलंत; दुजाभाव धरला नाही. तुमच्या मैत्रीचा, तुमच्या सहवासाचा त्याग करतांना मी कशी गोंधळून गेलें आहे.

**अन०** :–अशा मंगलकाळीं रडूं नये गडे.

**प्रियं०** :–अलंकारांसाठीच निर्माण झालेल्या या रूपाला राना वनांतल्या फुलांनी का शोभा येणारी आहे!

( इतक्यांत शारद्वत, अलंकार व वस्त्रें घेऊन येतो. )

**शारद्व०** :–हे घ्या अलंकार! घाला ताईच्या अंगावर.

**प्रियं०** :–कुमार, हे कोठून आणलेत?

**शारद्व०** :–रानांतून! शकुंतलेसाठी फुलं आणायला गुरुजींनी सांगितलं, म्हणून रानांत गेलों तों –

एका वृक्षानं हें चंद्रकिरणाप्रमाणं धवल रेशमी वस्त्र दिलं; तर दुसऱ्यानं पायाला लावण्यासाठी हा लाक्षारस दिला, आणि इतर लतांनी वनराजींतून हात उभारून हे सारे अलंकार दिले.

( अलंकार देऊन जातो. )

**अन० :**–सखे, यावरून तं पतिगृहीं गेल्यावर राजाची आवडती होणार हें निश्चित !

**प्रियं० :**–असले अलंकार मी कधी वापरले नाहीत; पण चित्रकलेशीं माझा जो परिचय आहे, त्या अनुरोधानं मी हिला कशी सजविते पहा.

**शकुं० :**–तुझं चातुर्य मी काय जाणत नाही !

( मैत्रिणींसह जाते. )

## [ प्रवेश ४ था ]

( स्थळ– आश्रम. कण्वमुनि खिन्न मनाने प्रवेश करतात. )

**कण्व :**–माझी कन्या शकुंतला, आज सासरी जाणार या विचारानें माझं निग्रही मन कसं व्याकूळ झालं आहे; आणि गंहींवरून आल्यामुळं कंठ सद्‌गदित झाला आहे. अरण्यवासी असूनहि ममत्वामुळे मी इतका कष्टी झालों, मग गृहस्थाश्रमी लोक कन्याविरहाचं दुःख कसं सहन करत असतील ?

( गौतमी प्रवेश करते. )

**कण्व :**–गौतमी !

**गौतमी** :–गुरुदेव, राग तर आला नाही ना शकुंतलेचा!

**कण्व** :–नाही, किंचितहि नाही. वस्तुतः हें माझं सुदैवच! शकुंतलेनं पुरुवंशांतील राजाची निवड केली, यापरतं आणखी काय पाहिजे! उत्तम शिष्याला विद्या देऊन त्याला पारंगत केलं म्हणजे गुरूला जसा आनंद होतो, तसा मला आज आनंदच झाला आहे.

( शकुंतला नवीन वस्त्रें परिधान करून प्रवेश करते व सर्वांना नमस्कार करते. )

**कण्व** :–बाळे, शर्मिष्ठा जशी ययाति राजाची आवडती होती, तशी तूंहि दुष्यंताची लाडकी हो! आणि पुरुराजाप्रमाणं प्रतापी कुमाराला जन्म देऊन दुष्यंताचं कुल धन्य कर!

**गौतमी** :–हा तर भगवंतांनी वरच दिला. केवळ आशीर्वाद नव्हे हा.

**कण्व** :–अहो, तपोवनांतील वृक्षांनो! ही माझी कन्या शकुंतला आज पतिगृहीं चालली आहे, तिला आशीर्वाद द्या. तुम्हांला पाणी पाजल्याशिवाय ती स्वतः कधी पाणी प्याली नाही; अलंकाराची आवड असूनहि तुमच्या वरच्या प्रेमानं जिनं कधी तुमची पालवी खुडून वेणींत घातली नाही; तुम्हांला पहिला बहर येतांच जी आनंदोत्सव साजरा करी; ती तुमची ही शकुंतला आज सासरीं चालली आहे. तिला निरोप द्या!

( आकाशांतून पुष्पवृष्टी होते. पशुपक्ष्यांचे आवाज ऐकूं येतात. )

**गौतमी**:–मुली, तरुवरांनी तुला आशीर्वाद दिला आहे; त्यांना नमस्कार कर, बाळ!

( शकुंतला नमस्कार करते. )

**शकुं० :**—अनसूये, आर्यपुत्रांना भेटण्यासाठी मी जरी उत्कंठित झालें असलें, तरी हें तपोवन सोडून जायला माझं पाऊलच पुढं पडत नाही.

**अन० :**—तुला एकटीलाच हें दुःख होत आहे असं समजूं नकोस. तपोवनाचीहि तीच अवस्था आहे. तीं पहा हरणं! तोंडांत घेतलेला दर्भाचा घांस, अर्धवट खालीं टाकून स्तब्ध उभी आहेत. मोरांनी तर नाचणंच टाकून दिलं आहे आणि—

**प्रियं० :**—आणि वेलीसुद्धा अश्रुबिंदूंप्रमाणं पानं गाळताहेत. ही तुझी प्रिय वनजोत्स्ना!

**शकुं० :**—सख्यांनो, जिच्यावर मीं बहिणीसारखी पाखर घातली; जिचं पालन-पोषण केलं; त्या माझ्या या आवडत्या वेलीला तुमच्या ओटींत घालतें. तिला सांभाळा!

**अन० :**—पण बाई, आम्हांला कुणाच्या ओटींत घातलं आहेस?

**कण्व :**—अनसूये, तुम्ही दोघींनीं शकुंतलेला धीर द्यायचा, तें सोडून हें असं काय बरं करतां? शोक आंवरा!

**प्रियं० :**—सखे, तो पहा दीर्घापांग कसा तुझ्याकडं पाहात उभा आहे. आणूं त्याला?

**शकुं० :**—नको. एकदा गळीं पडला म्हणजे मला त्याला सोडवणार नाही.

> बाळ, आता मी तुला सोडून चालले. केविलवाण्या दृष्टीनं माझ्याकडं कशाला पाहातोस? स्वार्थामुळं मी निष्ठुर झालें आहे रे!

**कण्व :**—शार्ङ्गरवा, दुष्यन्तराजापुढं शकुंतलेला उभी करून त्याला सांग. म्हणावं, ' आमच्या अनुज्ञेशिवाय तुम्हीं एकमेकांना वरलं. तरीहि संयमानं आम्हीं तुमचा संयोग मान्य केला आहे. हिचा पत्नी म्हणून स्वीकार कर. तुझ्या इतर स्त्रियांत हिला स्थान दे. पुढं हिच्या दैवीं असेल तें घडेल. आम्हीं आप्तांनी तें बोलून दाखवूं नये. समजलं ?

**शार्ङ्ग० :**—समजलं, गुरुदेव.

**कण्व :**—मुली, आता तुला थोडा उपदेश करावयाचा आहे. आम्ही जरी वनांत राहात असलों, तरी लौकिकांतल्या गोष्टी आम्ही जाणतों.

**गौतमी :**—प्रज्ञावंतांना माहीत नाहीत अशा कोणत्या गोष्टी आहेत, गुरुदेव ?

**कण्व :**—माझे बाळे, सासरीं गेल्यावर तूं कशी वागशील ?

**शकुं० :**—कशी वागूं, बाबा ?

**कण्व :**—तेथील वडीलधाऱ्या आप्तजनांची नित्य सेवा करीत जा; सवतींना मैत्रिणींसारखं मान; पतीनं एखादा अपराध केला तरी त्याच्याशीं क्रोधानं वर्तूं नको; सेवकांशीं सौजन्यानं वाग; आणि सुदैवानं वैभव प्राप्त झालं तरी गर्विष्ट होऊं नको. अशा प्रकारें संसारांत वागणाऱ्या स्त्रियांना ' गृहिणी ' म्हणतात. अन्यथा त्या आपला आणि उभय कुलांचा अधःपात करतात.

**गौतमी :**—सासरीं जाणाऱ्या मुलीला हाच उपदेश योग्य ! मुली, हें सारं ध्यानांत ठेव बरं !

**शार्ङ्ग०** :—गुरुदेव, आता जायला अनुज्ञा द्या.

**कण्व**:— मुली,—

**शकुं०** :—बाबा ! बाबा, तपश्चर्येमुळं आधीच तुमच्या शरिराला कष्ट झाले आहेत, त्यांत आणि माझ्याकरिता दुःख करून मनाला आणि शरिराला कष्ट देऊं नका.

**कण्व** :—मुली, तुझी वारंवार आठवण यावी अशा अनेक वस्तु इथं असताना मनाला कष्ट होणार नाहीत हें कसं शक्य आहे ? बाळ, लहानपणापासून तुला अंगाखांद्यावर खेळविली; तुझं दुखणंबाणं काढलं; तुझ्या बालक्रीडा पाहिल्या; तुझं पालन-पोषण करून, तं एवढी मोठी झालेली मीं पाहिली; आणि आता तुझा त्याग करतांना दुःख करूं नका म्हणतेस ? या यातनांची तुला कल्पना नाही. जा, तुझा प्रवास सुखाचा होऊं दे. ' शुभास्ते पंथानः संतु ।'

( शकुंतला सख्यांना कडकडून भेटते. )

**प्रियं०** :—( बाजूस नेऊन ) सखे, त्या राजांन दिलेली मुद्रिका तुझ्या बोटांत आहे ना

**अन०** :—तिला नीट जप !

**शकुं०** :—म्हणजे ?

**प्रियं०** :—कांही विशेष नाही. अतिस्नेह असला म्हणजे अनिष्ट तेवढंच मनांत येतं म्हणून सांगितलं.

( मोठ्या कष्टानें दुःख आंवरून निरोप घेतात. गौतमी व शिष्य यांसह शकुंतला जाते .)

**प्रियं० :**—बाबा, शकुंतलेवाचून हें तपोवन कसं उदास दिसतं आहे.

**कण्व :**—तिच्यावरच्या तुमच्या अतीव प्रेमानं, तुम्हांला असं वाटणं स्वाभाविक आहे. चला, शोक आंवरा आणि आश्रमाकडं चला.

> शकुंतलेला सासरीं धाडून मी एका दृष्टीनं आज निश्चित झालों. कारण कन्या वस्तुतः परक्याचंच धन ! एखाद्याची ठेव, ज्याची त्याला परत केल्याप्रमाणं शकुंतलेला सासरीं पाठवून मी ऋणमुक्ततेचा आनंदच उपभोगीत आहे.

( सर्व हळू हळू जातात. पडदा पडतो. )

**[ अंक दुसरा समाप्त ]**



# अंक तिसरा

## [ प्रवेश १ ला ]

( स्थळ—राजोद्यान. संगीत-शाळेंत म्हटले जाणारं गाणें ऐकत राजा गवाक्षाजवळ उभा आहे. जवळच माधव्य फळें खात बसलेला आहे. पडद्यांत गाणें—

" अभिनवमधुलोलुप हे मधुकरा अशी ।
भुक्तवस्तु विस्मृति तव जाहली कशी ॥ " )

**माधव्य :**—अरे वा: ! संगीत-शाळेंत हंसपदिकाराणीचा गाण्याचा परिपाठ चालू आहे वाटतं ?

**राजा :**—हो. पण त्या गाण्याचा मथितार्थ समजला का तुला ?

**माधव्य:**—(ऐकून) आज माझ्या मुखानं स्वत:ची निंदा ऐकून घेण्याची इच्छा झालेली दिसते तुम्हांला ? तर मग ऐका ! " अरे, नित्य नव्या मधाला चटावलेल्या मधुकरा, आम्रमंजरीचं अशाप्रकारं पूर्णतः चुंबन घेऊन, तिचा मधु स्वैरपणें चाखून, आता विश्रांति सुखासाठी कमलिनीकडे जातोस काय ! अरे लबाडा ! त्यांत तुला

आनंद आहे. पण त्याच वेळीं या आम्रमंजरीला विसरतोस हें चांगलं का ? काय ?

**राजा** :—खरं आहे. एके काळीं ही हंसपादिकाराणी मला फार प्रिय होती. पण अलीकडं माझं वसुमतीराणीकडं जास्त लक्ष असतं ना, म्हणून ही चिडलेली दिसते.

**माधव्य** :— खुळीच आहे. ज्याचा त्याचा आठवडा असतो.

**राजा** :—हें पहा, तिला जाऊन सांग. म्हणावं ' तुमचा चतुर टोमणा समजला आम्हांला. अगदीच कांही विसरलों नाहीं ' म्हणावं.

**माधव्य** :— कोण मी ? मी जाऊन सांगूं ? झालं, भागलं ! म्हणजे तुमच्यावरचा राग माझ्यावर काढून परिचारिकांकरवीं माझी टोपी उडवून, शेंडी पकडून यथेष्ट ताडण करवील ती !

**राजा** :—मित्रा, हें गाणं ऐकून, एखाद्या व्यक्तीचा विरह झाला नसतांनासुद्धा मला एक प्रकारची हुरहुर कां लागावी बरं ? कदाचित् गतजन्मींच्या स्नेहसंबंधाचा कांही लागाबांधा तर नसेल ?

( पुरोहित प्रवेश करतो. )

**पुरो०** :—महाराज, हिमालयाच्या पायथ्याशीं वास्तव्य करणारे कोणी तपस्वी, भगवान कण्वमुनींचा निरोप सांगण्यासाठी आले आहेत.

**राजा** :—असं ? मग त्यांचं स्वागत करून त्यांना इकडं घेऊन या.

( पुरोहित जातो. )

**राजा** :—काय रे ? हे शिष्य कण्वमुनींनी कां बरं माझ्याकडं

पाठविले असतील ? त्यांच्या यज्ञकार्यांत कांही विघ्न तर आलें नसेल ! आले वाटतं !

**माधव्य** :–आले वाटतं !

**राजा** :–बरोबर कोणी तरुण स्त्री दिसते !

**माधव्य** :–बरोबर कोणी तरुण स्त्री दिसते. वाळलेल्या पाला पाचोळ्यांतून एखादी हिरवीगार लहानशी वेली वर आलेली दिसावी, तशी या शुष्क ऋषिवरांच्या मेळाव्यांत ती तरुण स्त्री दिसते आहे.

**राजा** :–पुरे ! दुसऱ्यांच्या स्त्रियांबद्दल इतकी बारीक चर्चा बरी नव्हे. तूं जा बघूं ?

**माधव्य** :–हंसपदिकाराणीला निरोप सांगायला ना ! मग आमचं प्रेत उचलायला माणसं धाडून द्या लवकर !

( माधव्य जातो. दुसऱ्या बाजूने शकुंतला, गौतमी व शिष्यवरांसह पुरोहित येतो. )

**शार्ङ्ग०** :–राजा, तुझा जयजयकार असो !

**राजा** :–मी आपणा सर्वांना अभिवादन करतों. आपली होम-हवनाचीं कृत्यं निर्विघ्नपणें चालली आहेत ना ?

**शार्ङ्ग०** :–राजा, तुझ्यासारखा सज्जनांचं रक्षण करणारा राजा, पृथ्वीतलावर राज्य करीत असतांना, धर्मकृत्यांत विघ्न येणार कशी ?

**राजा** :–मग माझं ‘ राजा ’ हें नांव सार्थ ठरलं तर ? भगवान् कण्वमहर्षींचं कुशल आहे ना ?

**शार्ङ्ग०** :–हो. त्यांनी आपलं आरोग्य चिंतून आपल्यांला कळवावं म्हणून सांगितलं आहे.

**राजा** :–काय आज्ञा आहे, गुरुदेवांची ?

**शार्ङ्ग** :–त्यांनी सांगितलं आहे, एकमेकांची प्रीति जमल्यामुळं, त्यांच्या परोक्ष तुम्हीं त्यांच्या कन्येचा स्वीकार केलात हीं गोष्ट त्यांना मनापासून आवडली. कारण आपण जसे थोर लोकांत श्रेष्ठ आहांत, तशी ही त्यांची कन्याहि मूर्तिमंत सत्कृति आहे. आता तुमची ही प्रिय पत्नी तुमच्याकडं पाठविली आहे, हिच्याशीं धर्माचरण करा.

**शार०** :–आणि ही गर्भवती आहे, तेव्हा हिचं यथायोग्य पालन करा अशी त्यांची आज्ञा आहे.

**शकुं०** :–आत्या, आर्यपुत्र यावर कांहीच बोलत नाहीत. नुसतं ऐकतच आहेत.

**राजा** :–अहो, तुम्हीं सर्वांनी हें काय कुभांड रचलंय माझ्यावर !

**शकुं०** :–अगबाई, काय बोलणं हें ? हें भाषण नव्हे, अग्निवर्षाव हा !

**शार्ङ्ग०** :–राजन्, लौकिकांतल्या गोष्टी आम्हीं तुम्हांला काय सांगाव्यात ? तुम्ही त्या पुऱ्या जाणतां. सौभाग्यवती स्त्री सदैव माहेरीं राहूं लागली, तर सुशील असूनहि लोकापवाद तिच्याबद्दल भलतेंच बोलतो. तेव्हा माझ्या या भगिनीवर तुमचं प्रेम असो वा नसो, तुम्हीं हिच्याशीं लग्न केलं आहे, तेव्हा हिनं तुमच्याजवळ राहाणं युक्त !

**राजा** :–पण या तरुणीशीं मीं विवाह केला, असं म्हणतां तरी कसं ?

**शकुं०** :–म्हणजे ! हे इतक्यांत सारं विसरले !

**शार्ङ्ग० :**–हा काय कृतकर्माबद्दल उद्वेग की जाणूनबुजून अधर्माचरण ? अवज्ञा की उपेक्षा ?

**राजा:**–पण कुमार, जें नाही तें गृहीत धरून मला असा अवघड प्रश्न आपण कां टाकतां बरं ?

**शार्ङ्ग० :**–बरोबरच आहे. संपत्तीच्या आणि अधिकाराच्या मदानं तुला अशी विकृत भावना व्हावी हें स्वाभाविकच आहे.

**राजा :**–मुनिवर, नका ! नका अशा निंदागर्भ शब्दांनीं माझा अवमान करूं.

**गौतमी :**–मुली, आता लज्जा सोड ! तुझ्या तोंडावरचं अवगुंठन दूर कर , म्हणजे तरी ओळख पटेल तुझ्या या पतीला.

( ती अवगुंठन दूर करते. राजा तिच्या सौंदर्याने मोहून, तिच्याकडेच पाहात स्तब्ध राहातो. )

**शार्ङ्ग० :**–राजा, आता बोलत कां नाहीस ? शांत कां ?

**राजा**–अहो महाभाग, मी सारखा विचार करतों आहे, पण या अतिसुंदर स्त्रीचा मीं स्वीकार केला असं मला पुसटहि आठवत नाही, आणि तशांत ही गर्भवती आहे म्हणतां !

**गौतमी :**–हो !

**राजा :**–मग मी स्पष्टच विचारतों. हिच्याशीं मीं जिथं लग्नच केलं नाही, तिथं हिच्या उदरीं असलेल्या गर्भाचं पितृत्व मी कसं स्वीकारूं ? आणि हिचा अंगीकार तरी कसा करूं ? तुम्हीच सांगा. तुम्ही धर्माधर्म जाणतां ?

शार्ङ्ग० :—मग नकोच करूं स्वीकार ! ' अरे, हें धन स्वीकार ! ' अशी चोराची मळावणी मालकाला करावी लागणं यापरतं दुर्दैव तें काय ?

शकुं० :—मुळांत लग्न झालं की नाही ही जिथं शंका, तिथं माझ्या मनाच्या आकांक्षा कधी सफल होतील याची मी आशा कशी करूं !

शार्ङ्ग० :—एकूण हें असं झालं तर ? वहावा रे राजा, स्वतःच्या श्रेष्ठपणाच्या आवरणाखालीं तूं आम्हांला, हिला, सर्वांना ठकवलंस, गुप्तपणानं हिच्याशीं कर्म केलंस, आणि तें ज्यांनी क्षम्य मानून तुला सत्पात्र ठरविलं, त्या माझ्या गुरूचा तं चांगला उद्धार केलांस ! अरेरे, नाई, शकुंतले ! काय केलंस हें ?

गौतमी :— मुली, हा राजा तर असं म्हणतो, तेव्हा जी काय त्याची खात्री पटवायची ती आता तुझी तूंच पटव.

शकुं० :—माझ्या प्रीतीचा असा शेवट झाला ! हे सारंच नाकारतात ! तेव्हा कांही आठवण देऊन तरी काय उपयोग ?

गौतमी :—बाई, काय करायचं तें आताच कर ! नाहीतर जन्मभर दैवाला दोष देत बसावं लागेल.

शकुं० :—आर्यपुत्र ! पण लग्नाबद्दल जिथं साशंकता, तिथं मी अशी उघडपणानं हांक तरी कशी मारूं ? पौरवराज, तुम्हीं आश्रमांत येऊन माझ्या सारख्या स्वभावतःच भोळ्या मनाच्या मुलीला, आपल्या गोड गोड भाषणांनी मुलविलंत, आणि वचनं देऊन विश्वास दिलात, आणि आता हें विपरित बोलणं आपल्यांला शोभतं कां ?

**राजा** :—काय बोलतां हें ? स्वतःबरोबर माझ्याहि कुलाचा अधः-पात करण्याचं धाडस तुम्ही कां करतां ?

**शकुं०** :—महाराज, मी परस्त्री आहे, तेव्हा माझा स्वीकार कसा करावा या शंकेत आपण असाल तर खुणेची वस्तु दाखवितें, म्हणजे तरी तुमची संशयनिवृत्ति होईल ना ?

**राजा** :—वा ! फार नामी कल्पना ! !

( शकुंतला आंगठी शोधते. )

**शकुं०** :—अगबाई, आंगठी ? आंगठी काय झाली ? चांगली बोटांत होती निघतांना !

**गौतमी** :—आंगठी नाही ? शचीतीर्थाचं दर्शन घ्यायला गेली होतीस त्या वेळीं बोटांतन गळून गंगेत तर पडली नाही ?

**राजा**:—स्त्रियांच्या प्रसंगावधानी बुद्धीचा मोठा चतुर नमुना पाहिलांत ना, गुरुजी ?

**शकुं०** :—दैवानं चांगला दावा साधला ! महाराज, आपल्याला कांही सांगायचं आहे.

**राजा** :—सांगा ! आतापर्यंत दाखवायचं होतं, आता ऐकवायचं आहे. ऐकूं या ! बोला !

**शकुं०** :—एक दिवस लतामंडपांत आपण बसलों असतांना, पाण्यानं भरलेला कमलपत्राचा द्रोण आपल्या हातीं होता. होय ना ?

**राजा**:—ऐकतों आहोंत आम्ही !

शकुं०:—त्या वेळीं मीं मुलासारखा पाळलेला दीर्घापाङ्ग नांवाचा बाळ-मृग आपल्याजवळ आला; म्हणून आपण तो द्रोण त्याच्यापुढं केलांत. आपला परिचय नसल्यामुळं तो त्याला तोंडहि लावीना. पण तोच द्रोण मीं पुढं केला, तेव्हा तो निर्भयपणें प्याला. आपण लगेच हंसून म्हटलंत ' सजातीयांवरच सर्वांचा विश्वास असतो, तुम्ही दोघं अरण्यवासी ! ' हें तरी खरं ना ?

राजा :—कार्यसाधु स्त्रियांच्या, अशाप्रकारच्या मधुर पण असत्य शद्बांना कामी पुरुष भाळतात. पण मी त्यांतला नाहीं.

शकुं० :—अरे दांभिका, आपल्याप्रमाणं सर्वांचा नीच स्वभाव आहे, असं का तुला वाटतं ? प्रेमाच्या, धर्माचरणाच्या गोड गोड गोष्टी बोलून, माझा तूं चांगला घात केलांस. तुझ्यासारखा घातकी प्राणी तर या जगतांत नसेल !

राजा :—या दुष्यन्ताचं चारित्र्य सर्वांना ज्ञात आहे. माझ्या कपटी वागण्याचा अनुभव अद्याप तरी कोणाला आला नाही.

शकुं० :—तें दुर्दैव माझ्या वांटणीस आलं ! महाराज, आपण फार चांगलं केलंत ! तुमच्या नांवावर, तुमच्या कीर्तीवर भुलून, मी तुमच्या वासनेला बळी पडलें. मुखांत अमृताची वाणी आणि पोटांत विषाचा आशय असणाऱ्या तुझ्यासारख्याच्या नादीं लागून मी मात्र स्वैरिणी झालें.

शार्ङ्ग० :—आता कशाला रडून साजरं करतेस ! वडिलधाऱ्या मंडळींना न विचारतां, न पुसतां असा मनमानेल तसा नाचरेपणा केला म्हणजे त्याचा शेवट असाच व्हायचा. कोण कसा आहे, याची

पुरी निश्चिती केल्याशिवाय प्रेम—आणि तेंही चोरटं प्रेम—केलं, की त्या प्रेमाचं पर्यवसान असं वैरांत होतं.

राजा :—अहो, तिच्या बोलण्यावर विश्वास ठेवून, आपल्या कटु शद्बांनी माझ्यावर कां प्रहार करीत आहांत ?

शार्ङ्ग० :—असं ? राजा ! अरे, आजपर्यंत तपोवनांत राहि-ल्यामुळं खोटं म्हणजे काय हें जिला माहीत नाही, ती लबाड ! आणि शास्त्र म्हणून तूं कपटनीति शिकलास, तो सत्यवादी ! अरे कपटपटु, तूं आज कर्तव्य टाळूं पाहातोस, पण त्यामुळं ही बिचारी कुलकलंकिनी ठरली !

राजा :—अहो, ब्रम्हन् ! मला सांगा, या बिचारीला फसवून मला काय मिळणार ?

शार्ङ्ग० :—अधःपाताशिवाय दुसरं काय ?

राजा :—अधःपात ?

शार्ङ्ग० :—हो, हो ! अधःपात ! रौरवाचें धनीपण !

राजा :—आमच्या वंशांतील कोणीहि रौरवाची आकांक्षा धरली नाही.

शार्ङ्ग० :—म्हणून तूं अघाडी मारलीस !

शारद्० :—बंधो, पुरे आता. उगीच वाद कशाला ! गुरुजींच्या आज्ञेप्रमाणं आपण आपलं काम केलं. राजा, ही तुझी लग्नाची पत्नी इथं उभी आहे. हिचा स्वीकार कर अगर त्याग कर ! आमचं काम झालं. आम्ही चाललों !

शकुं० :—दादा, या कपटी राजानं माझा विश्वासघात केला; आणि तुम्हीहि मला टाकून चाललांत ! इकडं सासर लाभलं नाही, आणि तिकडं माहेर मी गमावून बसलें. आत्या— !

गौतमी :—मुलांनो, ही दीनवाणें रडणारी तुमची बहीण, तुमच्या-मागून येत आहे. तिचा पतीनं तर त्याग केलाच आहे, आणि आपणहि तिला टाकून चाललों ! तिनं बिचारीनं काय करावं बरं !

शार्ङ्० :—कुठं आहे ती ? काय ग ए, ढलगज पोरी ? तुला हवं तसं वागायला पाहिजे नाही का ? मागं हो ! हा राजा म्हणतो त्याप्रमाणं तूं जर थादांत खोटं सांगत असलीस, तर कुलटे, तुझ्या बरोबर आम्हां सर्वांना कलंक लावून गुरुगृहीं कशाला येतेस ? आणि तुझ्या म्हणण्याप्रमाणं तूं खरोखरीच या राजाशीं लग्न केलं असलंस, तर इथंच रहा. राणी म्हणून नव्हे, तर दासी म्हणूनसुद्धा तुला इथंच राहिलं पाहिजे.

राजा :—अहो, भलती आशा दाखवून हिला बिचारीला माझ्या दारीं कशाला टाकून जातां ! हिच्याशीं अधर्माचरण मी कदापि करणार नाहीं.

शार्ङ्० :—अरे, इकडं रंगमहालांत गुंग होऊन तिकडं वनांत केलेलं कृत्य सोइस्करपणें विसरणारा तूं, तुला अधर्माचं कसलं भय ! चल, शारद्वता—

( गौतमी व शारद्वतासह जातो. )

शकुं० :—धरणीमाते, आता तूंच माझी माता ! तूं तरी मला आंसरा दे !

( शकुंतला रडत त्यांच्या मागोमाग जाते. )

**राजा :**—हे खरंच तिला सोडून गेले की ! गुरुदेव, यांतलं खरोखरीच मला कांही आठवत नाही. पण त्या दीन स्त्रीचं म्हणणं तरी खोटं कसं मानूं ? कारण तिचा क्रोध लबाडीचा नव्हता, कारुण्यपूर्ण कथनहि मनापासून दिसलं. आणि दुःखाचा आवेग तरी मी लटका कसा मानूं ?

( इतक्यांत बाहेर विजेचा कडकडाट होतो व लोकांचा कोलाहल वाढतो. दमनक धांवत प्रवेश करतो. )

**दमनक :**—महाराज, अद्‌भुत घटना ! फारच अद्‌भुत !

**राजा :**—बोल, काय झालं ?

**दमनक :**—महाराज, ते शिष्यवर रागानं निघून गेले; आणि ती तरुण स्त्री दैवाला दोष देत, दुःख करीत राजद्वारांतून जाऊं लागली तोंच स्त्रीच्या आकाराचा तेजाचा एक लोळ आकाशांतून खालीं आला, आणि क्षणांत त्या तेजांत ती स्त्री अदृश्य झाली.

( राजा चिंताक्रांत होतो. तोंच पडद्यांत— हंसपदिकाराणीनं म्हटलेलें पद ऐकूं येते. )

" अभिनवमधुलोलुप हे मधुकरा अशी !
भुक्तवस्तुविस्मृति तव जाहली कशी ॥

( राजा त्यामुळे जास्तच अस्वस्थ होतो. )

**राजा :**—गुरुजी, आम्ही हंसपदिकाराणीच्या महालांत आहोंत. कांही कार्य निघालं तर अवश्य कळवा.

( राजा जातो. )

## [ प्रवेश दुसरा ]

स्थळ—राजद्वार.

( जेरबंद केलेल्या एका कोळ्याला घेऊन राजसेवक प्रवेश करतात. )

**कोळी** :—धनी, माझं वाईच ऐका !

**१ ला** :—आम्हांला कांही सांगूं नको ना ? मी कांहीं ऐकायचा नाहीं. अरे, याच्यावर नीट ध्यान ठेव. पळून जाईल ! मी वाड्यांत जाऊन या आंगठीची या कोळ्यानं सांगितलेली गोष्ट महाराजांच्या कानावर घालून, त्यांची आज्ञा घेऊन येतों.

( जातो, इतक्यांत दमनक येतो. )

**दम०** :—काय रे, काय भानगड आहे ?

**२ रा०** :—अहो, हा चोर गांवांत महाराजांची रत्नखचित आंगठी विकत होता.

**दम०** :—महाराजांची आंगठी ? काय रे, सोद्या ! महाराजांची आंगठी कशी आली तुझ्याजवळ ? चोरा !

**कोळी** :—मी चोरी कशापाई करूं जी ?

**दम०** :—मग काय महाराजांनी तुला ती दान म्हणून दिली होय रे ! मोठा विद्वान ब्राम्हण की नाही तूं !

**कोळी** :—मी बामन न्हायी; मासं धरून पोट भरनारा कोळी हाय, धनी.

**दम०** :—अरे, तुला जात नाही विचारली. बोल !

कोळी :—सांगतों ! कल दुपारी शचीतीर्थासनं मासं धरून घरला आलों. त्यांत एक लई मेटा मासा गांवला. म्हणून त्यो चिरला. त्यांत निगाली आंगठी ! सकाळीं चार पैसं करावं म्हनून सोनाराला दावीत होतों, तेवढ्यांत यांनी मला पकडल.

दम० :—माशाच्या पोटांत आंगठ्या सांपडतात ? खरं सांग.

( दमनक त्याला मारूं लागतो, तोंच पुरोहित व पहिला सेवक प्रवेशतात. )

पुरो० :—थांब, दमनका ! मारूं नको त्याला ! त्याचंच म्हणणं खरं आहे.

२ रा० :— काय म्हणतां ?

पुरो० :—हो ! ती आंगठी महाराजांनी पाहिली मात्र, त्यांना कशाची तरी एकाएकी आठवण झाली. आणि स्वभावतःच धीराचे असूनहि त्यांचे डोळे आश्रूंनी भरून आले.

दम ० :—जा बाबा तूं !

पुरो ० :—आणि हें त्या आंगठीच्या किंमतीइतकं द्रव्य दिलं आहे तुला महाराजांनी !

( थैली देऊन जातो. )

१ ला ० :—अरे, काय ! उखळ पांढरं झालं की याचं !!

कोळी ० :— मालक, ही तुमची दया. तुमी पकडून आनलं म्हनून हें धन दिसलं !

२ रा :—अरे, मग त्याची कांही आम्हांला ठेव की !

कोळी ० :—चला की ! मी काय न्हायी म्हननार हाय व्हय !

दुम० :— ठीक, ठीक ! गड्या, आजपासून तूं आमचा मित्र ! चल, पहिली ओळख मदिरेच्या साक्षीनं पक्की करूं या ! चला रे !

( कोळ्यांसह सर्व जातात. )

## [ प्रवेश २ रा ]

( स्थळ :— राजोद्यान. हातांतील आंगठीकडे पाहात राजा विमनस्कपणें बसलेला आहे. माधव्य व पुरोहित जवळ उभे आहेत. )

राजा ० :— गुरुदेव, ही मुद्रिका पाहिली, आणि सारा प्रकाश पडला. धुळीनं ज्याचा निर्मळपणा कलंकित झाला आहे, अशा आरशांत प्रतिबिंब स्पष्ट उमटत नाही. पण तोच स्वच्छ केला, की कसं यथायोग्य दिसतं तसं ही मुद्रिका पाहातांच साऱ्या गोष्टी कशा कालच घडल्यासारख्या आठवत आहेत. शकुंतलेशीं माझा गांधर्व-विवाह झाला होता हें खरं ! अगदी खरं !

पुरो ० :—चमत्कारच म्हणावयाचा !

राजा ० :—मित्रा, मीं तिला घालून दिली, त्या वेळीं तूं तेथे नव्हतास हें खरं ! पण त्यापूर्वी कधी तिच्याबद्दल कांहींच कसा बोलला नाहीस ? का तूंहि विसरलास ?

माधव्य ० :—अहो, मी कसा विसरेन ? पण आश्रमांतून परत निघतांना तुम्हींच नाही का मला पुनःपुन्हा बजावलं की, 'तें सारं भाषण थट्टेचं, गमतीचं. खरं कांहींच नाही त्यांत.' म्हणून ! मग ! आणि अकलेच्या बाबतींत आम्ही यथातथाच ! तेव्हा मला तेंच खरं वाटून मी मूग गिळून बसलों.

राजा:— बरोबर आहे. भवितव्यतेच्या आड कोणालाहि जातां येत नाही, हेंच खरं.

माधव्य :—तरी बरं, तुमची पुण्याई मोठी म्हणून ती मुद्रिका गंगाप्रवाहांत पडली ; तिथं माशानं गिळली ; मासा धीवराला सांपडला ; धीवर बिचारा भोळा म्हणून ती विकायला तो नगरांत आला; आणि तुमचे नगररक्षक दक्ष म्हणून त्याला पकडून घेऊन राजवाड्याकडं आले.

राजा:—मुद्रिका मिळाली, स्मृति परत आली; पण शकुंतला ? तेजांत पूर्णत: विलीन झाल्यामुळं आतां माझ्या प्रियेचं दर्शन मला कुठलं व्हायला ! प्रिये, कारणाशिवाय मी तुझा त्याग केला ना ? पश्चात्तापानं पोळणाऱ्या माझ्या हृदयाला शांत करण्याकरितां एकदातरी मला दर्शन देऊन माझ्यावर कृपा कर ! दया कर ! !

( भमिष्ठासारखा निघून जातो. )

पुरो० :—पश्चात्तापानं उत्कट झालेल्या त्यांच्या प्रेमाला आणि निर्मळ स्वभावाला शोभणारीच ही वृत्ति ! त्या मुद्रिकेनं काय घोटाळा केला हा ? एका गोड संयोगाचा किती दुर्दैवी विपर्यास हा !

( पडदा पडतो. )

[ अंक तिसरा समाप्त. ]



# अंक ४ था

## [ प्रवेश पहिला ]

( स्थळ– राजोद्यान. एका बाजूस एक मोठा चित्रफलक ठेविलेला असून, जवळच रंगाचें साहित्य आहे. पडदा उघडल्यावर किंचित् वेळाने, पार्श्वभागीं एक धुराचा लोट उठतो व त्यांतून सानुमती अप्सरा प्रकट होऊन पुढे येते. )

सानु० :–या दुष्यन्त राजानं शकुंतलेचा अवमान करून तिला घालवून दिली, त्यावेळीं मातेच्या कर्तव्यानं मेनकेनं तिला उचलून, मानवांना अज्ञात आणि दुर्गम अशा भगवान मारीचांच्या आश्रमांत, आम्हां अप्सरांच्या सन्निध आणून ठेविली. सुदैवानं तिला सुलक्षणी पुत्राची प्राप्तिहि झाली. या गोष्टीला उणीपुरी सहा वर्षं होऊनहि ती बिचारी सदैव या राजाच्या विचारानं अस्वस्थ असलेली पाहून, या राजाकडील कांही वृत्त समजलं तर पाहावं म्हणून मेनकेनं मला मुद्दाम धाडलं आहे. हें काय ? हें चित्र कुणाचं ! काय वेडी मी ! माझ्या सखीचं– शकुंतलेचंच ! किती यथायोग्य प्रतिकृति ! एकूण या राजानं शकुंतलेचं नांव अगदीच टाकलं आहे असं नाही. नाही–तर प्रथम त्याग करून पुनः चित्ररूपानं कोण कशाला दर्शन बांधील ?

हें काय ? या राजप्रासादांत साराच शुकशुकाट कसा ? वसंतऋतूचं आगमन झालं असतांनाहि इथं उत्सव कसा सुरू नाही ? खरं म्हणजे उन्मादक, आणि मधुर गीतांचा काळ हा ! ही आम्रमंजरी किती मोहक दिसते !

( मोहर काढून वांस घेते. )

**सानु०** :–पुरी फुलली नाही, तरी वांस किती मधुर !

( इतक्यांत माधव्य काठी आपटत येतो. )

**माधव्य** :–कोणी, कोणी काढला मोहर ? काय ग ए ! तुम्हां परिचारिकांना किती घसा फोडून सांगितलं, की कोणी आम्रमंजरीला हात लावूं नका म्हणून ! तरी तुमचा मोडपणा कांही जात नाही.

**सानु०** :–पण भटजी, वसंतऋतूच्या आगमनानं बहरलेली ही आम्रमंजरी पाहून तरुण मनाला तिचा मोह पडणारच की !

**माधव्य** :–अग, समजलं ! समजलं ! ! पण राजाज्ञा आहे त्याला काय करणार ? तिचं तर उल्लंघन करतां येत नाही ! आम्रमंजरीचं कौतुकच काय पण राजाज्ञेनं वसंतउत्सवहि बंद आहे, हें तुला माहीत नाही ?

**सानु०** :– माहीत असतं तर अशी उद्धटपणानं वागलें असते का मी ?

**माधव्य** :–म्हणजे नुकतीच चाकरीला लागलीस वाटतं ?

**सानु०** :– हो, ना !

**माधव्य** :–मग बरोबर ! अग, महाराजांनी शकुंतलेला वाळवून

दिली, पण पूर्वी आपण तिच्याशीं एकांतांत विवाह केला होता याची जाणीव त्यांना आपली मुद्रिका पाहातांच झाली, आणि तेव्हापासून पश्चात्तापानं ते रंजीस आहेत. सहा वर्षं झालीं या गोष्टीला.

**सानु० :**—असं, असं !

**माधव्य:**—त्या विचारानं ते सारखे तळमळत आहेत. आनंद देणाऱ्या गोष्टी ते मुद्दाम झिडकारतात; मंत्रिजनांची दैनंदिन भेटहि घेत नाहीत; मंचकावर रात्रंदिवस तळमळत पडतात ;आणि गम्मत म्हणजे अंत:पुरांतील स्त्रियांना भलत्याच नांवांनी संबोधून, चूक ध्यानीं येतांच लज्जेनं गोंधळतात !

**सानु० :**—बरं झालं भटजी, तुम्हीं सांगितलंत, नाहीतर माझ्या हांतून भलतीच चूक झाली असती.

**माधव्य :**—तेव्हा आता चालायला लाग आपल्या कामाला ! नाहीतर हा एकांत मला भलती चूक करायला लावील.

( पडद्यांत— राजा:— मित्रा, माधव्या ! )

**माधव्य :**—जा, पळ पळ ! महाराज आले !

( सानुमती पळत जाऊन एका खांबाआड लपते. राजा विमनस्क अवस्थेंत प्रवेश करतो. )

**राजा:**—त्या हरिणाक्षीनं विनवून, त्रागा करून, रडून, संतापून माझी स्मृति जागी करण्याचा प्रयत्न केला. पण माझं दुष्ट हृदय त्या वेळीं पूर्णत: झोपलेलं होतं, आणि आता तें जागं झालं आहे, पश्चात्तापानं होणाऱ्या वेदना सहन करण्यासाठी.

( खिन्नपणें बसतो. माधव्य वारा घालतो. )

**राजा** :–मित्रा, पुरे रे ! अरे, मनाला कशाचाहि उत्साह वाटत नाहीं. धैर्यहीन वृत्तिमुळं, सारं जग कसं शून्यवत भासतं आहे. सुदैवानं अमृत–कुंभाची प्राप्ति झाली असतांना मीं अभाग्यानं तो लाथाडून, त्याचे तुकडे तुकडे केले. मित्रा, अशी कशी रे विस्मृति झाली !

**माधव्य** :–हे एक न उलगडणारं कोडंच झालय ! अ ज एखादी गोष्ट विसरावी आणि चार दिवसांनी मुद्रिका पाहातांच आठवावी !

**राजा** :–खरं तर या मुद्रिकेचीच मला करुणा येते, कारण माझी पुण्याई जशी अल्प होती, तशीच तिचीही असावी. एरवी त्या गुलाबी नखाग्रांच्या कोमल करांगुलीतून ती गळून पडलीच नसती.

**माधव्य** :–दैव तुमचं, हिचं, आणि त्या शकुंतलेचं म्हणावयाचं झालं !

**राजा** :–एकूण साऱ्या जगाच्या निंदेचा विषय मी झालों ना ? मित्रा, असहाय्य झालेली माझ्या प्रियेची त्या वेळची अवस्था आठवली की मन कसं दीन, कष्टी होतं. तो पहा ! त्या दिवशींचा कटु प्रसंग ! मीं धिःकारल्यामुळं, अत्यंत दुःखी होऊन ती आपल्या आप्तजनां-मागून जाऊ लागली. तेव्हा तिला गुरुवत् असलेला ऋषिकुमार 'थांब' म्हणाला. त्या वेळीं दचकून, घाबरून ती थांबली आणि अश्रूंनी भरलेल्या नेत्रांनी तिनं माझ्याकडं अशा कांही संतापानं पाहिलं, की— ती पहा ! नको, प्रिये ! नको ! मी तुझा अनंत अपराधी आहे. विषारी बाणाप्रमाणं तूं मला जाळूं नकोस ! जाळू नकोस ! !

( दुःखातिशयाने अस्वस्थपणें फिरतो. )

**माधव्य :**—महाराज, भानावर या ! भानावर या ! !

**राजा :**—तें स्वप्न होतं की माया-मोह ? नाही, नाही, बुद्धीभ्रमच तो ! — आणि आता त्या साऱ्या गोष्टींची आठवण विरहावस्थेंत झुरतांना करावयाची ! खरंच पुनरपि दर्शन घडणार नाही का माझ्या प्रियेचं ? का माझ्या पुण्याईचा संचयच संपला ?

**माधव्य :**—असं का म्हणता ? भवितव्यतेच्या मनांत तुमचा समागम व्हावा असं असेल तर तो अकल्पितपणें होईलच. कारण ही मुद्रिका नाही का अगदीं अथांग जलाशयांतून अभावितपणें हातीं आली ?

**राजा :**—थांब, आधी त्या मुद्रिकेचाच समाचार घेतो. मुद्रिके, त्या नाजूक बोटांचा सहवास त्यागून तूं पाण्यांत कां उडी मारलीस ?— पण तूं तरी काय सांगणार ? तूं तर अचेतन ! माझ्या प्रियेचे गुण तुझ्या ध्यानीं कसे येणार ? कारण मी सचेतन असूनहि तिचा धिःकार केला, तिथं तुला दूषण देण्यांत काय अर्थ आहे !

( चित्रफलकाजवळ जाऊन बसतो; व एकाग्रतेने पाहात राहातो. माधव्यहि त्याच्यासारखाच चित्राकडे पाहात उभा राहातो. थोड्या वेळाने— )

**माधव्य :**—अरे, मी असा भ्रमिष्टासारखा या चित्राकडं पाहात काय उभा आहे ? यांच्या नादानं मलाहि वेडाचाराची लहर आली काय ? हे ! हे बसतील राजवाड्यांत, आणि आमच्या बोकांडीं बसेल कुत्र्यांची चावडी ! अहो, राजन् ! मित्रवर ! महाराज ! अहो,

पौरवराज ! अहो, ही खरी शकुंतला नव्हे, तिचं चित्र आहे, चित्र !

राजा :–शेवटीं हें चित्रच ना ? अरेरे, इतका वेळ मूर्तिमंत माझी प्रिया समोर उभी आहे असं मानून मी सुखाच्या अथांग सागरांत डुंबत होतों. मित्रा, त्या सुखस्वप्नांतून जागं करून या रमणीय लीला तूं चित्र केलंस ना !

माधव्य :–तसं थोडं चुकलं खरं माझं.

राजा :– फार वाईट केलंस! फारच !!

माधव्य :–हो, हो ! मला देखील हें चित्र आहे, हें आताच उमगलं आणि चुकून गेलं तोंडातून. वाः ! भावनेच्या आविष्काराचं किती सुमधुर आणि सजीव दर्शन ! महाराज, आपली ही चित्रं काढण्याची कुशलता पाहून, नामवंत चित्रकारांनी आपल्यांकडून परिपाठ घ्यावा, परिपाठ !

राजा :–या चित्रांत, आता भरण्यासारखं कांही राहिलं नाही. तरीसुद्धा हिच्या लावण्याची यथार्थ कल्पना कांही रेखाटतां आली नाही मला !

माधव्य :–त्या वृक्षाला रेलून जलकुंभाला सांवरीत, किंचित् श्रांत अशी उभी असलेली, शकुंतला झाली ! आणि चावटपणानं तिच्याकडं पाहाणाऱ्या त्या तिच्या मैत्रिणी दिसतात ?

राजा :– हो ! अगदी बरोबर !! मित्रा, दैवयोग कसा उलटा असतो पहा ! खरं लाथाडलं आणि हें, खोटं उराशीं धरलं. माझी सखी स्वतः इथं आली असतांना मी अभाग्यानं तिला अव्हेरली. आणि

आता तिच्या या चित्राकडं पाहून मला समाधान मानून घ्यावं लागत आहे. मार्गांतील नदीच्या स्वच्छ आणि मधुर जलाशयाचा त्याग करून मी वेड्यासारखा मृगजलामागून धांवतों आहे. मित्रा, पुरामुळं कोसळणाऱ्या नदीच्या दरडीप्रमाणं माझ्या साऱ्या आशा-आकांक्षांची पुरी धुळधाण झाली– धुळधाण झाली !

( कोकिळेचा सुस्वर ऐकूं येतो. )

राजा :–कोकिळेचा स्वर ऐकूं आला ! अरे, आम्रवृक्षाला नवी पालवी फुटून मोहरहि आला ! यावरून प्रेमिकांचा सखा वसंत पुन्हा आला ना ?

माधव्य :–अहो, ही त्याची त्यानंतरची सहावी खेप !

राजा :–म्हणजे तिच्या विरहाग्नींत मी गेली सहा वर्षं होरपळत आहे ना ?

माधव्य :–अहो, पण किती दिवस असं झुरत राहाणार ? खरं म्हणजे आपल्यासारख्या विचारी माणसानं असं शोकाच्या आहारीं जाणं बरं नव्हे. प्रचंड झंझावातांत पर्वत अचल राहातात.

राजा :–तेंहि माझ्या ध्यानीं येतं; पण— मित्रा, हें अविरत दुःख मी किती सहन करूं ? जागरणामुळं स्वप्नांतील सुलभ भेटीची आशाहि मावळते, आणि अश्रूंमुळं हें कल्पना-चित्रहि अंधेरतं !

( पुरोहित दबकत प्रवेश करतो. )

माधव्य :–या ! कांही राजकर्म आहे का ? मग आणा ना ? असं वाट पाहात राहून कसं चालेल ?

राजा :–काय तें ?

पुरो० :–महाराज, धनमित्र नांवाचा एक व्यापारी, नावेच्या अपघातांत निपुत्रिक वारला. तेव्हा त्याची संपत्ती, राजनिधींत सामील करायची कीं—

राजा :–अरेरे, अपत्यविहिनांची स्थिती किती करुणास्पद ! गुरुदेव, त्याची कोणी स्त्री गर्भवती नाही ?

पुरो० :–आहे, महाराज !

राजा :–मग संपत्ती राजनिधींत कां ? पित्याच्या संपत्तीचा वारसा गर्भाला मिळणंच युक्त !

पुरो० :–आज्ञा !

( पुरोहित जातो. )

राजा :–मित्रा, निपुत्रिकाची संपत्ती भलत्यालाच जाते. मग माझ्या पुरुवंशाचं ऐश्वर्य ? माझ्या मृत्यूनंतर आपल्यांला पिंडप्रदान कोण करील, या विवंचनेंत या दुष्यंताचे पूर्वज स्वर्गांत साशंक असतील.

माधव्य :–महाराज, शकुंतला गर्भवती होती.

राजा :–हो ! तेव्हा मी निपुत्रिक नव्हेच ! काय हें ? स्वतःचं बीज उदरांत असलेल्या धर्मपत्नीचा मीं उघड उघड त्याग केला; कुलाची प्रतिष्ठा अव्हेरली; बी पेरून पिकाला आलेल्या जमिनीचाच मीं मूर्खानं त्याग केला. काय करूं ! काय करूं ! !

( अस्वस्थ होतो व दुःखाच्या आवेगांत बेशुद्ध होतो. )

माधव्य :–अरे, अरे ! महाराज मूर्च्छित झाले. पाणी पाणी ! !

( धांवत जातो, सानुमती पुढे येते. )

**सानु० :**—एकूण हें असं झालं तर ! पूर्वी घडलेल्या आणि आता होत असलेल्या गोष्टी यांचा कसा तो मेळ बसत नाही. विरहाचा जगाविपरीत नमुना हा ! एकूण काय परित्यागानं शकुंतलेला जें दुःख भोगावं लागतं, त्याचा परिहारच केला या राजानं. याची ही अवस्था पाहून मला किती आनंद होतो आहे ! काय मेली मनाची ठेवण तरी ? स्वार्थानं याचा मनःक्षोभहि सुखद वाटूं लागावाना ?

( राजा शुद्धीवर येत असल्याचे दिसतें. )

**सानु० :**—भानावर येतो आहे वाटतं ? याला सारं सांगितलं तर ! नको बाई, सांगितलेल्या कामाच्या आगण धनीण. स्वर्गांत जाऊन मेनकेला हें वर्तमान सांगावं आणि मग ती सांगेल तें करावं.

( जाते. राजा हळू हळू शुद्धीवर येतो. माधव्य पाण्याचा कलश घेऊन येतो. इतक्यांत कोणीतरी अदृश्य राहून त्याला धक्का मारतो. तो कोलमडतो. )

**माधव्य :**—अरे ! मला कां ? मेलों ! अरे, काय हें ? भूत का पिशाच्च ? अहो, कोणी तरी मला वाचवा ! अरे !!

( अदृश्यशक्ती त्याला ओढीत पडद्यांत नेते. )

**माधव्य :**—(आंतून ) मित्रवर ! महाराज !! अहो, मरतोंय मी !

**राजा :**—मित्रा, भिऊं नको ! आलों !

**माधव्य :**—अहो, काय भिऊं नको ? कोणी तरी उंस मोडल्या-सारखं माझे तीन तुकडे करीत आहे !

( राजा खड्ग घेऊन निघतो, पण मध्येच थांबतो. )

**राजा** :—कोण मातली ? देवेंद्राच्या सारथ्याचं स्वागत !

**माधव्य** :—(प्रवेशून) यज्ञांत पशूला ठुकडून मारावा तसं यानं मला मारलं, आणि याचं स्वागत ?

**राजा** :—मातली, एकाएकी आगमन ?

**मात०** :—राजन्, आपल्यांना देवेंद्रांचं आमंत्रण आहे. कालनेमीच्या घराण्यांतील दुर्जय नावाचा दानव, देवादिकांनाहि अजिंक्य झाला आहे. म्हणून आपल्यांना साहाय्यार्थ बोलावलं आहे. स्वर्गावर स्वारी होण्याचं भय आहे.

**माधव्य** :—अहो, पण मला मधल्यामध्ये मार कां दिला तें विचारा की !

**मात०** :—महाराज, आपण खिन्न दिसलांत, तेव्हा राग यावा म्हणून तें केलं. कारण इंधन हलविलं की अग्नि भडकतो; डिवचलं की नाग फणा काढतो; प्रक्षोभाशिवाय माणसाच्या पराक्रमाला धार चढत नाही.

**राजा** :—बरं, मग केव्हा निघायचं ?

**मात०** :—लगेच ! देवेंद्रांचा रथ घेउनच आलें आहे मी.

**माधव्य** :—मग काय, चला !

**राजा** :—म्हणजे तूंहि येणार काय ?

**माधव्य** :—मग ! मार काय फुकट खाल्ला ? मेल्याशिवाय स्वर्ग दिसत नाही म्हणतात, तो न मरतांच पाहायला मिळणार तर सोडा कां ?

राजा :—ठीक आहे. चल ! गुरुदेव, आम्ही देवेंद्राच्या कार्यासाठी निघालों आहोंत; तेव्हा आम्ही परत येईपर्यंत आपण प्रजेचं पालन करा.

पुरो० :—आज्ञा !

( सर्व जातात. )

## [ प्रवेश दुसरा ]

( स्थळ—मारीच ऋषीच्या आश्रमाजवळील स्थान. एक सहा सात वर्षांचें बालक, एका वृद्ध तापसीला हुलकावण्या देत पळत जातें. इतक्यांत शकुंतला प्रवेश करते. )

शकुं :—थांब, सर्वदमना, थांब. किती आवरायचं याला ! भारी अवखळ झाला आहे.

तापसी :—रानावनांत धांवायची भारी हौस हं ! किंचितहि रमत नाही आश्रमांत, आणि भीति तर कशाचीच नाही.

शकुं० :—तेजस्वी कुळाचें बीज हें असंच असायचं ! रानावनाची हौस म्हणतां ना ? तेंहि साहजिकच ! मातापित्यांचा स्नेह रानांत, वनांत वाढला, आणि पित्याप्रमाणं पुत्र धीट आणि शूर असणारच.

तापसी :—त्या राजानं तुझा त्याग केला. तरी तूं—

शकुं० :—त्यांनी त्याग केला म्हणून मला टाकतां येईल का त्यांचं नांव आणि नातं ? त्यांनी नाकारलं म्हणून माझा यांच्याशीं गांधर्वविवाह झाला आहे हें मी कशी विसरूं ? त्यांच्यावरचं माझं प्रेम—

जाऊंदे तें. तें पाहिलंत का ? नदीतीरीं कोणीतरी पांथस्थ स्नान करीत आहेत. दिसलं ? त्यांचं नैमित्तिक आवरलं की विनवून त्यांना आश्रमाकडं घेऊन या. अतिथिधर्माचं पालन व्हायला हवं.

तापसी :-त्यांत एक भिक्षुक दिसतो आहे. दुसरा— अग, देवेंद्रांचा रथ !

शकुं० :-दुर्जय दानवाचा पराभव होऊन तो युद्धांत मारला गेला, असं परवांच नव्हतं का वृत्त आलं ? तेव्हा विजयी झाल्यामुळं मातापित्यांना वंदन करायला देवेंद्र आले असतील.

तापसी :-त्या युद्धांत म्हणे खरं यश तुझ्या त्या दुष्यन्तराजाच्या साहाय्यामुळंच पदरांत पडलं देवेंद्रांच्या.

शकुं० :-आर्यपुत्रांच्या पराक्रमाविषयी मी तर कधीच साशंक नव्हतें. बरं जातां ना ? आणि बाळाला सांभाळा !

( तापसी जाते. )

शकुं० :-आज प्रातःकाल पासून मला सारे शुभशकुन कां बरं होत आहेत !

कसला तरी आनंद झाल्यासारखी माझी चित्तवृत्ती प्रफुल्लित झाली आहे; आणि आर्यपुत्रांची वारंवार आठवण येऊन प्रथम भेटीच्या पुनर्प्रत्ययाचा साक्षात्कार होत आहे. माझी तपश्चर्या वाया जाणार नाही असा मनाला विश्वास वाटतो बरा ! पण –

पण मी अशी आपल्याच विचारांत काय उभी ! अतिथींना आमंत्रण दिलं आहे.

( गडबडीने जाते. )

## [ प्रवेश तिसरा ]

( स्थळ: नदीतीर. माधव्य स्नान करून कांहीतरी पुटपुटत आहे. )

**माधव्य** :–चला ! नित्यनैमित्तिक आवरलं. आता हे राजश्री केव्हा त्या मारीच ऋषींच्या आश्रमात पदार्पण करायचं मनांत आणतील ? त्यावर आमच्या क्षुधेची परिपूर्तता !

( राजा प्रवेश करतो. )

**राजा** :–काय, मित्रा, कशी काय आवडली तुला इंद्रपुरी ?

**माधव्य**:–अहो, स्वर्गच तें ! काय थाट, काय माट, काय ऐश्वर्य, काय त्या अप्सरा आणि काय त्यांचं तें नृत्य-गायन ! छा, छा, छा ! भारी जम्मत आणि गम्मत ! आणि विशेष म्हणजे तो कल्पवृक्ष ! केवळ इच्छा-मात्रेंच हवं तें मिष्टान्न मिळायचं; पण इथं आता मला भूकच गिळायला बसली आहे. मला तर परत निघू नये असंच वाटत होतं, पण तुम्हीं लगेच प्रस्थान ठेवलंत.

**राजा** :–दानवांचा पुरा पराभव झाला, देवेंद्राचं काम झालं—

**माधव्य** :–तें झालं हो ! पण हा मातलि कुठं गेला ? आता येतो म्हणून गेला—

**राजा** :–आम्ही दर्शनासाठीं आलों आहोंत हें भगवान मारीचांना निवेदन करण्याकरिता गेला आहे.

**माधव्य** :–तें झालं हो ! पण इंद्राचाच सारथी तो, तिकडंच बसायचा देवेंद्राच्या मातापित्यांना त्यांच्या पुत्राचे पराक्रम सांगत, आणि

आम्ही बसायचं इकडं तिकडं !

( पडद्यांतः तापसी—अरे, अशा खोड्या करूं नको, बाबा ! अगदी आपल्या कुळाच्या प्रकृति-धर्मावर गेला ! )

**राजा** :-कोण ते ? दंगामस्तीचं हें स्थळ नव्हे !

**माधव्य** :-तें बघा तिकडं ! एक तापसी आणि एक बालक ! मित्रवर, अहो सिंहाचं पिल्लू !

**राजा** :-अरे, वाः ! लहान मुलांत सहसा न आढळणारी प्रौढांची साहसवृत्ति असणारा कोण बरं कुमार हा ?

**माधव्य** :-अरे, काय पोर आहे ? त्या सिंहाच्या छाव्याबरोबर चांगली कुस्ती खेळतो आहे की ! त्या पिलाचं तोंड उघडून काय पाहात आहे !

( पडद्यांत. तापसीः- नको रे छळूं त्या पिलाला !

**सर्व०** :-मग दांत किती आहेत तें दाखवीत कां नाही ?

**तापसी** :--काय बाई तरी, सर्वदमन उगीच नाही नांव ठेवलं कुळपतींनीं ! )

**राजा** :--या मुलाकडं माझं मन कां बरं ओढ घेत आहे ? याच्या खोडकर चेहरा पाहून मला त्याच्याबद्दल आपुलकी वाटूं लागली आहे. मित्रा, अहेतुपूर्वक केलेल्या हास्यामुळं ज्यांच्या दंतकळ्या दिसत आहेत; बोबड्या बोलमुळं ज्यांचं बोलणं श्रवणीय वाटतं; अशा मुलांना अंगाखांद्यावर खेळवून ज्यांची वस्त्रं मळीन होतात ते बाप धन्य होत.

( पडद्यांतून:- तापसी—अहो, तुम्ही तरी जरा इकडं या. आंवरा याला. )

माधव्य :–र, बाळ ! सोड त्या छाव्याला ! ती पहा सिंहीण उठली. हं ! तो ऐकणार ?

राजा :–मित्रा, ठिणगीच्या रूपानं असला तरी तो अग्नीच तसं हा महान् तेजाचं बीज असलेला कुमार ! मुला, त्या सिंहाच्या छाव्याला सोड !

माधव्य :–मी तुला दुसरं सुंदर खेळणं देतों. हें घे.

( सर्वदमन धांवत बाहेर येतो. )

सर्व० :–कुठं आहे ? बा !

( हात पुढे करतो. )

माधव्य :–देतों हं ! अरे, आता होतं. कुठं गेलं ?

राजा :–मित्रा, याच्या हातावर चक्रवर्तिपदाचीं चिन्हं आहेत !

( सर्वदमनाला जवळ घेतो. )

तापसी :–अगबाई, दोघांचा तोंडवळा किती सारखा !

राजा :–तापसीबाई, कुणाचा हा ऋषिकुमार ?

तापसी :–हा ऋषिकुमार नाही, पुरुवंशांतील राजकुमार आहे.

माधव्य :–काय म्हणतां ? राजन् !

राजा :–आणि इथं तपोवनांत कसा ?

तापसी :–अप्सरेशीं नातं असल्यामुळं, याची आई शकुंतला इथं या तपोवनांत प्रसूत झाली.

**राजा** :–शकुंतला !

**माधव्य** :–आणखी एक आशास्थान !

**तापसी** :–अगबाई, याच्या मनगटावर बांधलेला रक्षाकरंडक कुठं ग बाई पडला !

**राजा** :–तो पहा !

( राजा करंडक उचलून घेण्यासाठी जातो. )

**तापसी** :–हां, हां ! शिवू सुद्धा नका त्या करंडकाला !

**राजा** :–कां ? कां पण ?

**तापसी** :–भगवान् मारीचांनी याच्या जातकर्माच्या वेळीं औषधी मंत्रून याच्या रक्षणासाठी तो करंडक याच्या मनगटांत बांधला. तो तुटून पडला तर याच्या मातापित्याशिवाय कोणी त्याला शिवायचं नसतं.

**राजा** :–काय होतं शिवलं तर ?

**तापसी** :–एकदम सर्प होतो ना ? कित्येक वेळा आम्ही अनुभवलंय.

**माधव्य** :–पण इथं तर कांहीच झालं नाही !

**तापसी** :–अगबाई, होय की ? म्हणजे आपण— शकुंतलेला जाऊन सांगितलंच पाहिजे.

( तापसी धांवत जाते. )

**राजा** :–मित्रा, माझे मनोरथ अशा प्रकारें सफल झाले. हा घे.

माधव्य :-वा: ! म्हणजे सर्प होऊं दे की त्याचा ! अहो, मरायचंच तर या रानांत आणि साप चावून कां !

सर्व० :-सोडा मला ! मी आइकडं जाणार ! !

राजा :-पुत्रा !

सर्व० :-राजे दुष्यन्त माझे पिताजी ! तुम्ही नव्हे ! !

माधव्य :-खात्रीच झाली.

( सर्वदमन शकुंतला येत असलेली पाहून " आई " म्हणून धांवत जातो. )

राजा :-मित्रा, ती आली पाहा. माझं तिच्या रागापासून रक्षण कर.

( माधव्याच्या मागे लपतो. )

शकुं० :-( प्रवेश ) नेहमीप्रमाणं कंकणाचा सर्प झाला नाही. म्हणजे आर्यपुत्रांचं आगमन झालं की—

माधव्य :-वहिनी ! म्हणजे महाराज मला बंधु मानतात.

शकुं० :-आपण ! आर्यपुत्र ! दैवानं मत्सर विसरून माझ्यावर दया केली तर !

राजा :-प्रिये, मी तुझा अनंत अपराधी आहे. मला क्षमा कर.

( राजा तिच्या पायां पडतो. ती त्याला उठविते. )

शकुं० :-हें काय ! असं काय बरं करायचं ! असं नाही करू ! उठावं म्हणते ना ! इतकं नाही हं मनाला लावून घ्यायचं.

राजा :-प्रिये, त्या वेळीं कांही तरी अतर्क्य घडलं म्हणून विस्मरण झालं. भाग्य चालून येत असतां, मोहानं माणूस दूर पळतो, आणि—

**माधव्य** :--आणि आंधळ्या माणसाला सुवासिक मालेचा सर्पासारखा भास होतो, आणि म्हणून तो ती मलाच झटकून टाकतो.

**शकुं०** :-- जाऊं दे तें. माझ्या पूर्वजन्मींच्या संचिताचं फळ मला भोगावं लागलं. नाहीतर इतके प्रेमळ आपण,--आपल्या हातून असला निष्ठुरपणा झालाच नसता.

**राजा** :--ही मुद्रिका पाहातांच आठवलं सारं.

**शकुं०** :--हीच ती आणा इकडं. अगदी दूर फेकून देतें. ऐनवेळीं नाहीशी होऊन किती छळलं इकडं !

(मुद्रिका फेकते. माधव्य ती वरच्यावर झेलतो.)

**शकुं०** :--आपल्याला कुठं सापडली ?

**माधव्य** :--सांपडते कुठली ? तुमच्या बोटांतून निसटली ती पाण्यात पडली; पाण्यांत माशानं गिळली; मासा धीवराला सांपडला; धीवराला राजसेवकांनी पकडला आणि मुद्रिका महाराजांना मिळाली ! अशी झाली गम्मत !

( मातलि प्रवेश करतो. )

**राजा** :--मातले, माझे मनोरथ सफल झाले !

**मातली** :--त्यापेक्षा आनंदाचं वृत्त ऐका. तुम्हाला जी विस्मृति झाली त्याचं कारण भगवान मारीचांनी तपःसामर्थ्यानं जाणून सांगितलं, की ती यांना झालेल्या दुर्वासांच्या शापाचा परिणाम म्हणून.

**राजा** :--पण शाप कां म्हणून दिला दुर्वासांनी ?

**मातली** :--ते आश्रमांत आले असतांना, त्यांचें स्वागत न करतां या तुमच्या चिंतनांत दंग होऊन राहिल्या म्हणून.

**शकुं०** :--विरहामुळं माझं मन कुठं होतं भानावर !

**मातली** :--आणि त्या शापाचा प्रभाव तुम्हीं यांना दिलेली वस्तु दिसतांच संपणार होता.

**राजा** :--मुद्रिका सांपडली हें केवढं भाग्य !

**शकुं०** :--त्यापेक्षा आर्यपुत्रांवरचं परित्यागाचं दूषण गेलं हें खरं भाग्य.

**राजा** :--खरोखर असे दुर्दिन वैऱ्याच्याहि वांट्याला येऊं नयेत हीच भगवंताजवळ प्रार्थना !

**सर्व०** :--सर्वेऽपि सुखिनः संतु ।
सर्वे संतु निरामयाः ॥
सर्वे भद्राणि पश्यन्तु ।
न कश्चित् दुःखमाप्नुयात् ॥

( सर्व नमस्कार करतात. पडदा पडतो. )

* समाप्त *

## पद्यावली

(पान १)

राग: खमाज; ताल: धुमाळी.

पंचतुंड नररुंडमालधर पार्वतीश आधीं नमितों ॥
विघ्नवर्गनगभग्न कराया विघ्नेश्वर गणपति मग तो ॥
शाकुंतल कालिदासरचित हें नाटयरूपीं रचितों ॥
जाणुनिया अवमान नसोनि महत्कृत्य शिरीं घेतों ॥
ईश्वराचा लेश मिळे तरि मूढ यत्न शेवटीं जातो ॥
दत्तात्मज, बळवंत कविमतें आपणची रसिकार्जन करितों ॥१॥

——॥——

राग: झिंझोटी; ताल: त्रिवट. (पान- ९)

राजा —

शैवालें युक्त जैसें पंकज तें शोभतें ॥
शशिमाजी लांछनाचा बहु शोभा दीसते ॥
तैसी ही वल्कलानें किती नामी वाटते ॥
जातीच्या सुंदरांना काहीही शोभतें ॥

——॥——

राग: पिलु; ताल: धुमाळी. (पान - १७)

शकुंतला —

सखये अनसूये, थांबकि बाई ॥
येतें मी अजि कां घाई ॥
रुतला दर्भांकुर माझ्या पायीं ॥
मजला तो दुःसह होई ॥
शाखी कोरांटीस गुंतुन जाई ॥
सोडवितें तोंवरी राहीं ॥

——0——

राग: काफी; ताल: दीपचंदी. (पान - १८)

राजा - बाळा असे मुनिकन्या ।। मज ही ,
परि वेडें मन हें तन नाहीं ।। धृ० ।।
पाहुनि मलिच्या विविध विलासा ।।
मन घेई हें बहु विश्वासा ।।
स्मर जरि तुष्ट न होई ।।
मा परि बहु सुख यांतचि येई ।। १ ।।

———0———

राग: लीलांबरी; ताल: दादरा. (पान - २२)

राजा - नेत्र माझा चुकवुनि हळुचि पाहे ।।
अन्यमिष तें काढोनी हंसत राहे ।।
विनयवतिनें स्मर नाहिं झांकियेला ।।
नाहिं किवा उघडोनि दाविमेला ।। १ ।।

———0———

राग: कलंगडा; ताल. दादरा. (पान - २६)

राजा - मदना, चंद्रा ! सुवैरी तुम्ही जाहलां ।। धृ० ।।
कुसुमित तव शर शीतहि शशिकर ।।
दुःखचि देति मला ।। अरेरे दुःख० ।। १ ।।
वसंत वन्ही शशि निज किरणीं ।।
तव शर पवि बनला ।।
अरारे ।। तव० ।। मदना० ।। २ ।।

———0———

राग: बरवा; ताल: दीपचंदी. (पान -३०)

शकुंतला - तव मानस कैसें काय न कळे मुळीं मजला ।।
दिनरजनीं करितें हाय, विरहें देह तापला।।
बलवमदन हृदयांतरि हाणी कठिण शरांचा मार ।।
तरिकन झालें तव चरणीं मी ताप करीं परिहार ।।
निष्ठुर छळित मला ।। १ ।।

———0———

राग: जोगी; ताल: धुमाळी. पान – (३१)

राजा – छळितो तुजला परि मज जाळी मन्मथ रात्रंदिवसा ॥
कुमुदा मळंवि दिनमणि परि गे, चंद्रा करि नाहीसा ॥
तारक तूंचि मला ॥ हा कर तव करीं मीं दिधला ॥

—0—

राग: झिंझोटी; ताल: त्रिताल. पान – (३३)

शकुंतला – मी तप्त जरी मदनशरें विनय सोडुं का ॥
अनुरक्त जरी याच पदीं विनय सोडूं का ॥ धृ० ॥
गुरुजनासि कळुनि वळुनि हाय ते बरें ॥
जरि इष्ट तुम्हां होय तरी विनय सोडुं का ॥१॥

—0—

राग: पिलु; ताल: धुमाळी. (पान – ३९)

शकुंतला – अजि शेवटचा लाभचि हा ममतेचा मज होय तुमच्या करिंचा ॥
बहु दावियलें प्रेम निरंतर अपुलें, कधीं नाही अंतर पडलें ॥
प्रतिदिवशीं कोमल करि ची, ... णी–फणी आता वेंची ॥
त्या आशेचा लेश न उरला माचा शोक न आवरे मनिचा ॥१॥

—0—

राग: जोगी; ताल: धमाळी. (पान ४०)

ऋषिकुमार – क्षीर-तरुने शालु दिला हा, लाक्षारस दुसऱ्याने ॥
इतर लतानी हात उभारुनि दिधले हे दागिने ॥
ऐशी झाली कृति ॥ गुरुची अपार संपत्ती ॥ १ ॥

—0—

राग: जोगी; ताल: धुमाळी. (पान ४०)

कण्व – जाते कीं मम शकुंतला ही आजचि पतिसदना ॥
उत्कंठेनें काळिज तुटतें हुरहुर लागे मना ॥धृ०॥
गहिंवर दाटे कंठीं कसा ये बाष्पपूर नयनां ॥
चिंतेनें जड दृष्टी झाल्या कांहिच बघवेना ॥
मी वनवासी स्नेही, हिचा पण वियोग साहवेना ॥
न कळे कैसें गृहस्थ सोशिती कन्याविरहांना ॥१॥

—0—

राग: असावरी; ताल: त्रिताल. (पान ४२)

शकुंतला – जाई परतोनी, बाळा, जाई परतोनी ॥
निष्ठुर मी तुज टाकुनि जातें ,
येशि कशाला माझ्या मागोनी ॥ धृ ॥
जन्मतांच तव जननि गेली
सोडुनि तुज या तपोवनीं ॥
मींच पाळिलें लाड करोनी,
कांहि न अडलें कीं तुझें ॥
गेलें जरी मी, काय उणें तुज,
सांभाळिनी बाबा तुजलागुनि ॥ जाई० ॥ १ ॥

———0

राग: जोगी; ताल: धुमाळी. (पान ४५)

कण्व – परक्याचें धन कन्या तें त्या
देउनि आज मि सुटलों ॥
ठेव जशी मालकासि अर्पुनि, आज ऋणांतुनि फिटलों ॥
मुलींना या आतां ॥ गेली लाडकि मम दुहिता ॥ १ ॥

———0———

राग: ब्याहाग; ताल: दादरा. (पान ४६)

हंसपदिका – अभिनवमधुलोलुप हे मधुकरा अशी ।
भुक्तवस्तुविस्मृति तव जाहली कशी ॥

———0———

राग: खमाज; ताल: धुमाळी. (पान ६१)

राजा – हरिणाक्षी ती प्रिया माझी शकुंतला सति सुंदरी ॥
किंचित होतें भाग्य म्हणोनी, चालुनि आली एथवरी ॥
एकांतांतिल खुणा सखीनें, जरी सांगुनिया बोधियलें ॥
तिजला पाहुनी दुष्ट हृदय हें, त्या समयीं मूढचि झालें ॥
दैवगती किति विचित्र आहे, ऐनवेळीं मन हें निजलें ॥
विरह-दुःख भोगायास्तव हें, सांप्रत जागृत कीं झालें ॥ १ ॥

———0———

– ' कृपा कर ! दया कर !! ' या नंतर. – (पान ६०)

राजा– गेली घटिका फिरुन एकदा करीं पुन्हा कधि येईल का ॥
दुःख पेरुनी मनीं सुखाची आंस धरूं मी कशी फुका ॥धृ॥
अश्रुसिंचनें निर्माल्यातुन फूल पुनरपी फुलेल का ॥
जळीं बुडविला जरी, पालवी वठल्या वृक्षा फुटते का ।
विषवृक्षाला अमृतफळ कधि गोड गराचें येईल का ॥१॥
वण वण फिरलों, शोध घेतलों, परि न भेटली अजुन प्रिया ।
हेंच नशीबी, अखंड जळणे पश्चात्तापें पोळुनिया ।
भाव मनींचा जाणुन, देवा, क्षमा तू तरी करशिल का ॥२॥

भैरवी (पान ७२)

शकुंतला – मन का मोहरलें । माझें ।
वृत्ति अवघ्या बहरुन आल्या, अघटित हे घडलें ॥ धृ ॥
तीच असे मी दुखि सदाची ।
भयाणताहि तीच वनाचा ।
अधीरताही बघुन मनाची, मी तर बावरलें ॥ १ ॥
लवे मारुता डावा डोळा ।
भाग्यताजहि उजवा गेला ।
शुभद शकुन हे जणू सुचविती, दुर्दिन गे सरले ॥ २ ॥
वेडी आशा, वेडें हें मन ।
आता कुठलें पुनरपि मीलन ।
अभागिनीच्या भाळीं कुठुनी स्वर्गसौख्य असलें ॥ ३ ॥

———()———

( टीप – पदे–क्रमांक

१,२, ४,५,६,८,११,१४,१५,१६ हीं के. आण्णासाहेब किर्लोस्करकृत;

३, ७, ९, १०, १२, १३ हीं के. गो. ब. देवलकृत;

१७, १८ हीं कवि मा. म. पातकर (कोल्हापूर) कृत आहेत. ती प्रयोगाच्या वेळीं त्या त्या पानावरील लहान लिपीत मुद्रित केलेल्या पद्याऐवजी म्हणावीत व पुस्तकीचा दोष टाळण्यासाठी ती मागण गाळावीत. )